# कण्हेरीचीं फुलें

## कथासंग्रह

विष्णु गणेश भिडे
बी. ए. ( ऑनर्स )

प्रथमावृत्ति ] [ १ ऑगष्ट १९४०

किंमत १॥ रुपया

## मन खोलून--

हा संग्रह प्रकाशित होण्यास 'विविधवृत्त'कार श्रीयुत रामचंद्र काशीनाथ तटणीस, श्री. चं. वि. बावडेकर, श्री. य. गो. जोशी, रा. प्र. श्री. कोल्हटकर व श्री. भा. त्रि. नाडकर्णी यांचें आजपर्यंतचें साहाय्य कारणीभूत झालें आहे. वरील व्यक्तींबद्दल मी ज्या भावना बाळगतो त्या इथें शब्दांमध्यें फुलवून सांगणें मला अशक्य आहे.

लेखनांत माझी दमसांड होऊं न देणाऱ्या माझ्या मित्रांचीं संख्या फार मोठी आहे. या स्नेहीवर्गाचा पाठिंबा असल्यामुळें जरूर त्या उमेदीची उणीव केव्हांच भासत नाहीं.

छपाईची बाजू जनार्दन सदाशिव लिमिटेड या छापखान्यांतील व्यवस्थापकांनीं छान संभाळली, सबब त्यांचा आभारी आहे.

१ ऑगस्ट १९४० विष्णु गणेश भिडे



श्रीयुत चंद्रकान्त विष्णु बावडेकर

यांस

आदर-भक्तीनें

अर्पण

# कथाक्रम



## लोककथा

*

# चाकोरी बाहेर ! : : : १

[ १ ]

सोपान रामोशी रात्रीची गस्त आतांशी कुठें करूं लागला होता.

महिन्यापूर्वीच त्याचा बाप मेला; आई एकाशीं म्होतूर लावून परगांवीं गेली. आणि सोपान्यानें वहिवाटीनुसार स्वत:कडे आलेली बापाची चाकरी शिरावर घेतली.

याखेरीज बऱ्याच दिवसांपासून त्याचा जो दिवसा गुरें चारण्यास नेण्याचा उद्योग होता, त्यालाहि सोपानर्ने खंड पाडला नाहीं.

अशा प्रकारें रामोशीपणाबद्दल मिळणारी बलुती व गुरं चराईची रक्कम यांवर सोपानाचा उदरनिर्वाह चालला होता.

निम्मीअर्धिक रात्र गांवांत फिरून घालवल्यावर दिवसा पुन्हा कामधाम

हाताशीं घ्यायचें म्हणजे कोण दगदग पडे सोपानला. पण तो ठराविक वेळ खालीं होऊं देत नसे. उन्हें दिसूं लागलीं कीं आपला शिकारी कुत्रा सांगातीं घेऊन तो लोकांच्या गाईम्हशी चारण्यास निघावयाचा हें ठरलेलें.

तसाच आज सोपान गांवापासून खूप लांब जंगल भागांत गेला होता, व तो जनावरांच्या आसपास राखोळी करीत होता.

इतक्यांत सोपाननें मेंढीचें कर्कश किंकाळणें ऐकलें. त्याचा कुत्राही जवळपास आढळेना. आपल्या कुत्र्यानें मेंढी धरली कीं काय, तिचा घसा तो फोडतो आहे किंवा कसें, हें पाहण्यासाठीं तो आलेल्या आवाजाच्या अनुरोधानें धांवला.

एका लांडग्याशीं झगडत होता सोपानचा कुत्रा.

लांडगा होठा होता. कुत्रे होते अगदीं नवखे. असल्या झुंजा खेळण्याचा त्याचा हा प्रथमचाच प्रसंग !

कुत्र्याच्या मदतीला सोपान गेला. तो विलक्षण बळकट होता. नुसत्या काठीनें झोडपून त्यानें लांडग्याला अर्धमेला केला. पुढें कुत्र्यानें त्याची गठडी वळली. या हाणामारींत सोपानच्या कोऱ्या सदऱ्याच्या चिंध्या उडाल्या.

जरा लांबवर एक मेंढी पळत असलेली सोपाननें पाहिली.

लांडग्यानें ती कोठून आणली असावी हें सोपानला समजेना. तथापि शक्य झालेंच तर ज्याची मेंढी असेल त्याला ती परत देण्याच्या इराद्यानें मेंढीला सोपाननें पकडून ठेवली.

सोपानचा गुरें घेऊन माघारा निघण्याचा समय आला. त्याच वेळीं एक तरुण मुलगी शेळ्यामेंढ्या हाकीत तेथपर्यंत येऊन ठेपली.

सोपान जवळील मेंढी पाहून तिनें काळजीयुक्त झाल्यागत चेहरेपट्टी करून विचारलें ' इथं कशी आली ही मेंढी ? '

' लांडग्याच्या दाढेंतून सोडविली हिला माझ्या कुत्र्यानं.'

' अन् तुमचं अंगावरचं नवं धडोतं नुक्तंच फाटल्यासारखं वाटतं आहे !...'

' मीही गेलों मग कुत्र्याच्या मदतीला.'

' लांडग्यानं ह्या मेंढीला तोंडांत धरलेली मीं पाहिली मात्र ! मी पुष्कळ

ओरडलें, त्याच्या मागोमाग धावलें, लांडगा धूम पळाला—इतर शेळ्या-बकरी सोडून त्याच्या मागावर जाणं धोक्याचं होतं...!'

'तुम्हीं कुठं तरी अगोदर दृष्टीला पडल्या असाव्या माझ्या...!' सोपान विचार करीत उद्गारला.

'मी संतू कुंभाराची मुलगी विठी. कधीं मातीच्या खेपा वाहाव्या लागतात गाढवावरून. तरी बहुतेक मीं शेळ्या-मेंढया घेऊन रानांत येतें चारायला!'

'एवढी बकरी, शेरडया, मेंढया, तुमचंच का हें सारं?'

'होय. शेताला खत लागतं ना. मेंढयांचं खत आम्ही पुरवतों. खंडी-दीड खंडी, लागतील तशा मेंढया बसवतो आम्ही वावरांत. धंदाच आहे आमचा तो.'

'तुम्ही ह्याच जंगलांत येतां, तर दिसलां नाहीं त्या इतके दिवस?'

'कुरण लहान का आहे हें?' विठी हंसून उत्तरली. 'तुम्ही या टोंकाला तर मी त्या टोंकाला. हेंच बघा. सकाळीं गमावलेली मेंढी कुठं तरी गवसेल या वेड्या आशेनं त्या वेळेपासून भटकत होतें, ती आता या बाजूला आलें. चलायचं ना! दिवस टळूं म्हणतोय्.'

सोपान व विठी दोघांनींही आपापलीं जनावरें गांवाच्या दिशेला हाकारलीं.

[ २ ]

बहुधा रोज सोपान आणि विठी जंगलांत एकत्र राखोळीच्या कामासाठीं जमत. गोष्टी बोलतां बोलतां त्यांचा दिवस मजेंत जाई. उभयतांच्या शिदोरीलाही कांहीं और लज्जत लागे. ह्याशिवाय रात्री व दिवसा असे दुवार कष्ट करणाऱ्या सोपानाला विठी गुरांमागें पाहण्याला असल्यामुळें चांगली दोन—तीन घंटे निर्धास्त मनानें झोंपही घेतां येई.

साध्या ओळखींची परिणति हळूहळू एकमेकांना एकमेकांचा ध्यास लागण्यांत झाली.

एकदां विठी म्हणाली, 'सोपानराव, आतां उद्यां मला म्हाताऱ्यानं नेमून दिलेल्या कामावर गेलं पाहिजे. इथं येतां यायचें नाहीं.'

'ठीक आहे. कुणी नाहीं आलं तरी माझी राबणूक मला केलीच पाहिजे. तूं होतीस तेव्हां आपलं बरं होतं. बराच वेळ विश्रांति मिळत होती!'

'माझ्या मनांत येऊ नये असं का आहे! बापाचे शब्द झेलायला हवेत ना पण! म्हाताऱ्यानं सांगितलं आहे त्या फुलसुंदरचं नवीन घर होत आहे तिकडे विटा न्यायला. अस्सा बाईट आहे मेला तो मारवाडी...'

'कां ग?'

'आज रामपारींच चहासाठीं थोडा गूळ आणायला गेलें होतें त्याच्या दुकानावर. त्याची ती नजर–मला सारखा निरखीत होता मेला बिनअब्रूचा...'

'अग, आहेच तो तसा!' सोपान म्हणाला, 'मला त्याचे प्रताप माहीत आहेत. रात्रीं मी रखवालीला हिंडतो कीं नाहीं! तुझ्याच घराच्या पलीकडल्या आळींत ती नायकीण नाहीं का रहात...'

'हो.'

'मध्यरात्रीचा हा निघायचाच तिकडे रोज अन् हा घर तिजकरतांच बांधतो आहे असं म्हणतं खरं कुणीसं.'

'माझ्या म्हाताऱ्याला हें खपायचं नाहीं. त्याचा स्वभाव फार तिखट– गैरवर्तनाच्या साफ विरुद्ध आहे तो. खेरीज कुंभाराच्या जातीचा अभिमान अति आहे बापाला माझ्या—'

'आणि मी तर रामोशी...' सोपान मध्येंच कांहींसा अस्वस्थ होऊन बोलला.

'छेः! तशा बाबतींत इतके नाहीं. खोटाड, नीतिभ्रष्ट वागणूक यांबद्दल म्हणतें मी.' विठीनेंही किंचित् गोंधळलेल्या अवस्थेंत आपल्या भाषणांत दुरुस्ती केली; 'परवां एके ठिकाणीं मेंढ्या बसवायला नेल्या, तेथील मालकानं ठरलेल्यापेक्षां कमी दाणे घातले, आणखी वर शिरजोरी दाखवायला लागला. चपराकच हाणली धडधडीत माझ्या म्हाताऱ्यानं!'

'विठे, असा इतका तापटपणा उपयोगाचा नाहीं. जराशी तरी लीनाई हवी माणसाच्या हाडींमाशीं. भलत्याच वखताला उतावळी व्हायची अशानं. संतू कुंभार लहानपणापासून सुखांत असला पाहिजे...'

'होय. हें बरीक खरं. सध्यासुद्धां गांवांत दुसरा कुंभार कुणीच नाहीं, त्यामुळं म्हाताऱ्याचा धंदा जोरकस आहे...'

'खरीच. पण मी नरमाईनें घेतो आपला. एकटोणपे खाळे, जमांतील

दुःखांचा इंगा कळला, कीं हंसरा माणूस गंभीर होतो आणि उतावळा विचारी बनतो...'

'तुम्हीं कोणचीं दुःखं अनुभवलीं आहेत हो?'

'माझ्या आईबापांचं मजवर लहानपणापासून यथातथाच प्रेम. बाप वारला, तशी माझी आई पाट लावून निघून गेली. सगळ्या घरच्या पंचायतींत आम्हींच डोकं खुपसायचं. यापुढं घरांत एखादंदुसरं मनुष्य येईपोतर...'

सोपाननें विठीकडे मिस्किलपणें बघितलें. विठीनें अशा कांहीं मोहक लकबेनें मान वेळावली तेव्हां!

'सोपानराव, माझ्या मनांत आज कांहीं दिवस घोळत आहे...' विठी जराशानं कांहींशा कातर स्वरांत बोलली.

'काय?'

'तो पहा, लांब निवडुंग दिसतो आहे ना, त्यामधं एक छोटं देवीचं देऊळ आहे. आपण तिच्या साक्षीनं लग्नाची आणभाक ...' ठिकाण दाखवतांना विठीचा हात नकळत सोपानच्या खांद्यावर पडला.

'हात्तिच्या! चल कीं! इतके दिवस लावलेस ही साधी बाब सुचवायला!'

सोपान आणि विठी देवळाजवळ गेली. तेथलें पत्र्याचें दार उघडून देवीला उभयतांनीं अभिवादन केलें.

सोपान म्हणाला 'देवते, आमची अक्षय्य भेट घडवून आण. असं झालं कीं मी तुला एका सबंध मेंढीच्या रक्ताचा अभिषेक घालीन.'

दोनही भावविवश हृदये माघारीं परतलीं.

आजचें संभाषण सुरू कुठून झालें व आपण पोंचलों कोणची मजल याविषयींची कल्पना परस्परांना सुखवीत होती.

परत फिरतांना विठी उद्गारली, 'मी आतां कांहीं दिवस येणार नाहीं. पण मला भेटाल ना? रात्रीं बाराला गस्त घालायच्या वेळेला चक्कर टाकीत जा आमच्या बाजूला."

'हूं.'

अन् उभयतांची ताटातूट होतांना—

'उद्यां रात्रीं माझी गांठ घ्यायचं कबूल केलं आहे बरं का!' विठीनें पुनश्च बजावलें.

[ ३ ]

ठरल्या सुमाराला सोपानच्या वाटेकडे डोळे लावून विठी उभी असतांना ती फुलसुंदरच्या नजरेला पडली.

'काय विठे, संतू कुंभार काय खटपटींत आहे?'

'जागा नाहीं आहे म्हातारा' विठीनें उत्तर दिलें.

'मग या वेळीं तूं इथं उभी?' फुलसुंदरनें पृच्छा केली.

'तुम्ही पलीकडच्या गल्लींतल्या नायकिणीच्या मकाणीं निघालांत ना, तें पहायला!' विठीच्या जिभेवर आला होता हा जबाब—परंतु ती कांहींच बोलली नाहीं.

'एऽ विठे...' फुलसुंदर दोन पावलें पुढें सरकला.

'अहो सोपानराव' दुरून येणाऱ्या तरुणाला उद्देशून विठीची हांक होती.

'कोण? सोपान्या रामोशी? काय बाबा—आबादीआबाद आहे कीं नाहीं गांवांत? तुझ्या गस्तीच्या आरोळ्या आताशी ऐकायला येत नाहींत रे...'

'तुम्ही आपल्या घरीं नसता वाटतं रात्रीं. तिथं तर मुद्दाम मीं लल्कारी देतों. तुम्ही गांवांतले उंचीचे लोक!' सोपान स्मित करीत बोलला.

फुलसुंदर वरमल्यासारख्या तोंडानें मार्गाला लागला.

'फुलसुंदर, तुम्हांला दिसत नाहीं कीं काय अंधारांत! तुमचं घर या इकडे नि तुम्ही चालताहांत उलट दिशेनं!' सोपाननें जरा गंमत केली.

'लख्ख दिसतं आहे बरं मला!' फुलसुंदरनें कांहींसे चरफडत म्हटलें.

[ ४ ]

यानंतर पांचसहा दिवस रोज विठी व सोपान एकमेकांना रात्रीं भेटत. प्रत्येक खेपेला त्यांचीं जीं प्रणयाकुल भाषणें होत, तीं एक व्यक्ति आडून ऐकत असे.

ह्या सकाळीं जंगलांत आपलीं जनावरें घेऊन सोपान आणखी विठी जाणार होतीं.

विठी बकऱ्यामेंढयांचा तांडा घेऊन निघाली, तेव्हां तिचा पाठलाग करीत कोणीतरी अडोशाअडोशानें चाललें होतें.

' विठे, मी आराम घेऊ का थोडा ? ' बराच काळ बोलणें झाल्यावर सोपान म्हणाला, ' अलीकडे पांचसहा दिवस सतत वीसवीस तास काम पडलं. हाडं कशीं भरून आलीं आहेत... '

' मी चेपूं का अंग ? ' विठी सोपानचे पाय रगडूं लागली. सोपान नको नको म्हणत होता—त्यानें तिचे हात धरून ठेवले.

क्षणभर दोन प्रेमळ नजरा एक झाल्या. विठी लटक्या कोपानें सोपानपासून दूर होण्याचा यत्न करीत असतांच त्यानें विठीला जवळ ओढलें. सोपानला कोठल्या तरी शक्तीनें जबरीनें मागें खेंचलें.

विठी घाबरून दूर उभी राहिली.

' अरे रामोशा, हे ढंग चालवलेस होय ! फुलसुंदरनें सांगितल्यापासून बघतों आहे. आज प्रत्यक्ष समजावण्याची वेळ गुदरली. हिचीच वाट पहात होतों... '

सोपान ओशाळला होता. स्वतःची खरोखरच चूक घडली असें त्याला वाटत होतें.

' विठे, आपली जात विसरलीस. या रामोशीबुवाच्या नादीं लागलीस, आणखी काय तुम्ही चाळे केले असतील—छे ! शरीराची लाही होते. थांब, या सोपान्याला अद्दल घडवतों चांगली... '

संतू कुंभारानें क्रोधाच्या भरांत भला थोरला दगड सोपानच्या मस्तकावर मारला—

' आयाई ऽ ग ऽ ऽ म्हाताऱ्या, काय करणी ही तुझी...सोपान...! ' विठीनें एकदम सोपानकडे धांव घेतली. संतूनें लेकीला दूर हुसकलें. त्याच्या नेत्रांत खून चढला होता.

समोर सोपान रामोशाचा छिन्नभिन्न देह पडला होता. विठी किंचाळली, तिला घेरी आली.

संतूचा आवेश ओसरला. त्याच्या काळजांत कांपरें भरलें. सोपानचें प्रेत त्यानें बऱ्याच अंतरावर खड्डयांत पुरलें व रक्ताच्या खाणाखुणा त्यानें बुजवून टाकल्या.

अर्धवट शुद्धींत असलेल्या विठीसोबत संतू शेळ्या–मेंढ्या व गुरें घेऊन निवासस्थानीं निघाला.

मेहमींच्या सरावानें सोपानच्या जनावरांना त्यांचीं घरें ठाऊक झालीं होतीं तिकडे तीं निघून गेलीं.

[ ५ ]

केव्हां तरी सोपान रामोशी मेल्याची वार्ता बाहेर फुटणार हें संतू जाणून होता. त्याचा जीव अतिशय धास्तावला. विठी कमजास्त बरळेल म्हणून त्यानें लेकीला कोणा नातलगाकडे रवाना केलें.

अन्नपाणी गोड वाटेना संतू कुंभाराला. फांसावर लटकतांना होणारे हाल क्षणोक्षणीं तो चित्तांत अनुभवूं लागला.

त्यानें लगेच फुलसुंदरला शरण जाण्याचें योजलें. कारण गांवगन्ना त्याचे व्यवहार मोठे दांडगे. कोर्टकचेऱ्या म्हणजे त्याच्या रोजच्या बैठकींतल्या बाबी—

सर्वसर्व सहानुभूतीच्या मुद्रेनें ऐकून घेतल्यानंतर फुलसुंदरनें म्हटलें, 'कालच सोपान रामोशी काय झाला अशी कुणकुण कानीं आली खरी!'

'काळेंकुट्ट आकाश बनलं, कीं एखादा तरी पाण्याचा थेंब चुकून-माकून निसटायचाच. कसं करूं हो आतां?' संतूनें फुलसुंदरपुढें डोकें टेकून हे शब्द उच्चारले.

आतां पावेतों साऱ्या बाबींत बेफिकीर, बेभान असलेला संतू कुंभार इतका गयावया आलेला पाहून गांवगुंडींत बाकबगार अशा फुलसुंदरनें त्यावर आपले पाश फेंकले. 'इतःपर तुझी एकूण एक वीट मी मागेन त्या भावांत मला मिळाली पाहिजे' संतू या अटीला कबूल झाल्यावर हलकेंच फुलसुंदर बोलला, 'अन् तुझी मुलगी विठी...'

'म्हणजे?'

'बेजबाबदार बनूं नकोस. ध्यानांत राख.. चट्कणीं करीन लफडी अं! नीट ऐक! तुझी पोरगी विठी अंधार पडला कीं माझ्याकडे वाडींत जा रोज. हें प्रकरण मी मिटवल्यानंतर एवढं व्हायलाच हवं.'

संतू स्तब्ध राहिला.

'कां! बोल!! आधींच बदफैली झालेली ती, मींच सांगितलें तुला लिव्या

सोपान्याशीं गाढ ओळखीबद्दल. मला आणखी कितीतरी तिच्या गुप्त हालचाली ठाऊक आहेत...!'

'बरं, ती राजी असेल तर आडकाठी नाहीं माझी!' संतू कुंभार म्हणाला.

'कसा सुरेख ताळ्यावर आलास!'

[ ६ ]

सोपाना नाहीसा झाला ही बातमी गांवांत उमटली. तथापि त्याचे जिव्हाळ्याचे चौकशी करणारे कोणीच नव्हते.

ज्या स्थळीं सोपानचें प्रेत पुरलें होतें, तेथें भयंकर दुर्गंध सुटल्याचें लौकरच आढळांत आलें.

पोलिसांनीं हाडें उकरून काढलीं. मेलेला प्राणी सोपान रामोशीच असावा असा कित्येकजणांनीं तर्क मांडला. कारण तो इकडे गुरें वळण्यास येत असे—शेवटच्या दिवशीं संतू कुंभारानें जनावरें आणलीं—इथपर्यंत तपासणी झाली.

संतूला गिरफदार करण्यांत आलें. परंतु फुलसुंदरनें दिलेला कुशल वकील आणि त्याला लाभणारा भरगच्च मेहनताना यांमुळें कज्जा फत्ते झाला. संतू तावूनसुलाखून पूर्णपणें निर्मळ निघाला.

कांहीं वेळां विठीचें नांव वर येऊं पहात होतें; पण त्याही भानगडी दाबून टाकण्यांत फुलसुंदरनें अजस्र कौशल्य खर्चलें.

खटल्याची पंचाईत मिटली. विठी आपल्या बापाच्या घरीं आली. मात्र संतू कुंभार फुलसुंदरचा पुरापुरा लाचार बनला.

[ ७ ]

'मग, विठीला दे ना पाठवून!'

'फुलसुंदर, ती न् तुम्ही, हवा तो गोंधळ घाला! मी आपणहून कांहीं करणार नाहीं आणखी तुमच्या बेतांत अडथळाही आणणार नाहीं.'

'अच्छा! पाहतों तिचं मन.'

आणि फुलसुंदरनें विठीचा ठाव घेतला.

एक दिवस डोक्यावर रांजण घेऊन विठी पाणी भरण्यास गेली होती ओढ्याला.

फुलसुंदर जाणूनबुजूनच तेथें गेलेला होता.

चलाखी करून हळूंच त्यानें आपल्या हातांतला रुपया तिच्या पाण्यानें भरलेल्या रांजणांत टाकला.

पाण्यांत चकाकणारें नाणें देखल्याबरोबर विठी कमालीची चिडली. रागाच्या उसळीसरशी तिनें कांठोकांठ भरलेला रांजण फुलसुंदरसमोर वाळूवर आपटला व बापाकडे निघाली ती थेट !

संतू विटांची भट्टी बनवीत होता.

'म्हाताऱ्या !' विठी वडिलाला चवताळून बोलली, 'घेऊं का या भट्टींत उडी !'

'विठाबाई, काय झालं ?'

'फुलसुंदरनें मला वाघाचा डोळा दाखवला. याचा काय अर्थ ?'

'तूं मारलंबिरलं नाहींस ना फुलसुंदरला ?' संतूनें घाबरत पृच्छा केली–

'म्हाताऱ्या, अरे असा थंड कां ? माझ्या सोपानला मारण्याच्या वेळची रग कुठं गेली तुझ्या अंगांतली ? मला वाटलं तूं सोपानच्या डोक्यांत मारलास त्यापेक्षांही मोठा दगड घेऊन आतां धांवशील–पण उलट मलाच भीत भीत विचारतोस, मी कांहीं फुलसुंदरला केलं का म्हणून ! जणूं तो तुझा जांवईच–जाऊं मी फुलसुंदरकडे ?'

'तूं हवी तशी वाग–मला विचारूं नको मुळींसुद्धां.'

'असं होय ! सोपानचं व माझं शपथेवर लग्न ठरलं असतां तूं ढवळाढवळ केलीस ! तेव्हां मी आलें होतें तुला पुसायला ! त्या वेळीं तुला सोपानची जात दिसली रामोशाची, आणि ज्याच्या मतानं तूं सोपानचें टक्कुरं ठेंचण्याला हात वाह्यलास, त्या फुलसुंदरची जात तूं अजूनहि ओळखत नाहींस अं ! त्या खेपेला तुझं वागणं मला बाणेदार वाटलं त्यासाठींच मी जगलें इतका वेळ ! त्या गिधाडाच्या–फुलसुंदरच्या गळा पडायला मला होकार देतोस–बोल, म्हाताऱ्या, नेभळट कसा बनलास एवढ्या लौकर ?'

'तसंच आहे पोरी. सोपान रामोशाला मारण्याचं काम मी तर्कटपणानं उरकलं आणि त्यावेळेपासून मीं फुलसुंदरच्या बिलकुल कह्यांत येलों. वास्तविक आम्हां वडील मंडळींना काय जरूर तुमच्या लगीन व्यवहारांत पडून, तुमचे तुम्हीं समर्थ असतांना ? पण आमचीं मनं बुरसटलेलीं, त्याच त्याच परीघांत गिरक्या खाणारीं. खरं म्हणजे तुझी व सोपानची

पीर्ती एकमेकाकडे झुलली यांत गैर काय होतें ? कुंभार व रामोशी या जाती नव्हत. पोटासाठीं हवा तो हवे ते कष्ट उपशील. धंद्यावरून जात-पात ठरवणं हा निव्वळ जुलूम आहे. ही चाकोरी झुगारून सहज रीतीनंच विवाह होऊं दिले पाहिजेत...'

'बस् कर बडबड तुझी ! धमक काय आहे तुझ्यांत ती समजली ! जगांत टोलेजंग कामगिऱ्या करायला तशाच तोलदारीची माणसं लागतात. प्राण घेणारीं जरी संकटं कोसळलीं, तरी त्यांना धडाका मारून तोंड देणं यांतच खरीखुरी मर्दाइ आहे. खून करणं ही लहानसान बाबत नाहीं. पण नंतर जीव बचावणं; कुंभार रामोशांच्या लग्नाला एका काळीं भलता विरोध करणं अन् आतां चाकोरी झुगारून जा असं म्हणणं—शुद्ध भ्याडपणा आहे हा...'

विठी तावातावानें तेथची निघून गेली.

[ ८ ]

तदनंतर विठी कुठे गेली, तिची अखेर काय घडली, याविषयींची विश्वसनीय हकीकत आज उपलब्ध नाहीं.

जंगलामधील देवीच्या देवळांत दाराचा पत्रा उखडून व त्यानें स्वतःचें मुंडके कापून कुणा व्यक्तीनें आपलें सर्व रक्त देवतेला वाहिलें अशी वार्ता मध्यंतरी कांहीं वाटसरूंनीं आणली होती.

देवीच्या देवालयांत दरवाजाचा काढलेला पत्रा अद्यापही आहे; देव-तेची मूर्ति देखील बरेच दिवस लालभडक दिसत होती.

विठी व सोपान यांच्या लग्नाबद्दलच्या आणाशपथा ज्या देवळांत झाल्या, उभयतांची लग्नगांठ जमल्यास सबंध मेंढीच्या रक्ताचा अभिषेक घालीन असा सोपाननें जिथें नवस केला, तेंच हें देवालय.

सर्व बाजू लक्षांत घेतां विठीनेंच आपलें रक्त देवतेला देऊन सोपानच्या अक्षय्य भेटीस्तव प्रयाण केलें असावें, चाकोरी झुगारून केवळ जाती-पातीचा किंवा धर्माचा विचार न करतां फक्त नैसर्गिक व स्वाभाविक आकर्षणावर आधारलेला विवाह साजरा व्हावा, यासाठीं सोपानला पुन्हां पृथ्वीतलावर आणण्यास विठी स्वर्गांत रवाना झाली असावी, असा एक तर्क संभवतो.

*

## कपलाहार ! : : : २

'ताई, ये, बस.'

रेतीचा सळसळ आवाज उमटला. नेत्रा शक्य तितक्या झपाट्यानें किनाऱ्यालगत आली.

ती होडींत स्थानापन्न झाल्यावर दयाळनें ती हांकारली.

'चांदणं किती मधुर पडलं आहे; नाहीं, दयाळ !'

'हं, त्या लाटा बघितल्यास ! तुझ्या मुलखांतला, देशावरचा मनुष्य जाईल नुसता भेदरून ! आपली नाव लाटांच्या कबजांत, त्या हेलावतील तशी हालणार;–धस्स व्हायचं देशावरच्या इसमाला हें पाहून.'

'पण माझं माहेर इथलंच ना ! दयाळ, समुद्र आपला नेहमीचा मित्र. त्याच्या सान्निध्यांत आपलं घर, माझा भाऊराया तूं...'

‘ आपली नाहीं ग मी गोष्ट सांगत. तूं सदा अशी दर्यातून हिंडलेली मजबरोबर. ताई, लहानपणीं आपण काजू आणायचे, आंबे काढायचे, फणसाचे गरे, शहाळीं...जें त्या वेळेला मिळेल तें...परंतु कांहीं ना कांहीं घेऊन होडग्यांत यायचे, मीं वल्हीं मारायचीं......’

‘ मज्जा-मज्जा वाटते नाहीं रे दयाळ बाळपणचे प्रसंग आठवल्यावर. कोंवळया वयांत तूं नि मी बारीक बारीक वाळूंत घर बांधायचीं, खेळायचं, बागडायचं...’

‘ अन् ताई, तुला पाण्यांत तरंगता येतं का ? नाहीं ! तरीच तुझा माझ्यावर पक्का विश्वास ! कधींही तूं भ्याली नाहींस. एकदां नौका तर अगदीं उपडी होण्याच्या बेताला आली होती. माझी बहीण घाबरट नाहीं बिलकुल ! ताई, तूं व मी सारख्याच उमरीचे...फक्त दोन वर्षांनीं तूं थोर.’

‘ दयाळ, ह्या बघ मीं कैऱ्या आणल्या आहेत ओच्यामध्यें. चाकू विसरलें ! अग बाई, मिठाची पुडी सांडली वाटतं वाटेंत ?’

‘ दातांनीं कैरी फोड ताई. समुद्राचं पाणी लाव तिला. हेंच मीठ. प्रकृतीला मुळीं देखील जपत नाहींस हं तूं...आतां तुझी एकटीचीच काळजी तुला घ्यायची नाहीं म्हटलं.’

‘ चल चावट ’ नेत्रा गाल फुगवटून बोलली.

‘ तुला डोहाळे फारच विचित्र होताहेत. परवांच तूं माहेरीं आलीस कीं आज तुझा होडीमध्यें चांदण्यांत बसून फिरायचा, आंबट चिंबट पदार्थ खाण्याचा हेका ! मला हिराकांतानं तुझ्यादेखतच बजावलं आहे तुला नीऽऽट संभाळायला...’

‘ दयाळ, अरे, हें पाणी केवढं उंच उडालं ! नाव कलंडायची तर नाहीं ? चल परत.’

‘ ताई, आजपोतर तूं केव्हांही असा भित्रा उद्गार काढला नाहींस; म्हणूनच मीं तुझ्या धैर्याची प्रशंसा गायिली; आतांच कुठं विहाराला गंमत चढूं लागली, नौका आनंदातिरेकानं डुलते आहे, चन्द्र हर्षामृत शिंपडत आहे वरून—’

‘ नको रे भाऊ—दयाळा, मला घरीं पोंचल्यानंतर चालूं दे तुझी

हौसमौज; त्यांच्या प्रेमळ दटावण्या मीं नजरेआड केल्या·दयाळ; ते कित्ती चांगले आहेत ! माझ्या मनांत कल्पना आली, मोठ्या जलाशयावर संचरावं, कैरीची चव चाखावी, चंद्रप्रकाशानं सगळीं नेसणं भिजावीं; नुसतं येऊं नये, तर नटून–थटून...आणि या हव्यासांत त्यांची आणखी एक आज्ञा मीं झिड्कारली ' नेत्रा गद्गत स्वरांत म्हणाली.

' कोणची ती ? '

' भाऊ, ही त्यांनीं मोहनमाळ करून आणली माझ्या हौसेखातर; अजून मीं पेटीतली काढलीच नाहीं. तुला, आपल्या बहिणींना, काकूंना, कुण्णाकुण्णाला दाखवली नाहीं मीं ती. बारशाला घालण्यासाठीं घेऊन आले. थोडश्या मिनिटांपूर्वीं नटण्याची इच्छा बळावली; चोराचिलटांची धास्ती; पदर खेचून गळा गुंडाळला होता—'

' अहाहा, ताई, काय वैभव खुलतं आहे सुंदर ! पाहूं !! आपल्या बहिणीला करीन मी लग्न झाल्यावर. '

दयाळची अशी परिस्थिति नव्हती. पण आनंदाचा आवेग—

नेत्रानें दयाळच्या हातांत मोहनमाळ दिली. ' ही मी त्यांना बदलायला सांगितली आहे. '

' कां ग ? '

' अरे, टिकल्यांचा चन्द्रहार सुद्धां मागं पडला–नवी पद्धत निघाली आहे चपलाहाराची. मोहनमाळ जुनी झाली. चपलाहार घेणार मी. निघायच्या घाईतच एका ओळखीच्या बाईच्या गळ्यांत मी तसा पाहिला. तिकडून म्हणायचं, सध्यां हा असूंदे, बऱ्याच उशीरां बोलते आहेस, बाळाचं बारसं साजरं गोजरं कर. माहेरीं सणासमारंभाला लेवून जात जा; आलीस कीं मोहनमाळ देऊं, चपलाहार घेऊं...'

' आपल्याला कांहींच या दागिन्याच्या बाबतींत पत्ता नाहीं. जुनी मोहनमाळ. जुनाट चंद्रहार, नवीन चपलाहार ! ओहो चपलाहार !! ही मोहनमाळ तरी कुणी लेकानं बघितली होती एवढे दिवस ? ' दयाळ ती न्याहाळीत म्हणाला.

इतक्यांत—

जलतरंगांच्या हेलकाव्यांनीं नावेला जबर हिसडा बसला.

दयाळनें वल्ह्याला हात घातला.

मोहनमाळ—

हायहाय !

त्याच्या बोटांच्या पकडींतून निसटली ती होडींत न पडतां पलीकडच्या भागांत म्हणजे अथांग सागरांत फेंकटली गेली.

'ताई...' दयाळ बावरलेल्या अंतःकरणानें किंचाळला.

'दयाळ... दयाळ... देवा... काय रे केलंस हें... त्यांचा शब्द मोडण्याचा परिणाम; पाण्यानं दगा दिला. दयाळ, कुणापाशीं हें बोलूं नकोस. काकूंच्या तोंडांत कदाचित् राह्यचं नाहीं. आपल्या बहिणी दुर्गा, निर्मला—मी त्यांची वडील बहीण; तूं त्यांचा थोरला भाऊ...आपणच त्यांचीं मायेचीं माणसं; त्यांना ह्याबद्दल थांग लागूं देऊं नकोस; उमलत्या कळ्या उगीच कोमेजतील.'

'मोहनमाळ मी बोळवली, ताई; सोन्याला हात लावला तर त्याची माती बनवण्याइतके करंटे किमयागार कित्येक असतात; तुला ती नकोच होती मोहनमाळ; तुला हवा होता—' दुःखपूर्ण उसासे सोडीत दयाळ कितींदा तरी म्हणाला, 'चपलाहार'

रात्र उत्तरोत्तर जास्त भीषण होत होती. चंद्रमा अधिकाधिक ऐश्वर्यानें विलसत होता.

दयाळ व नेत्रा यांच्या अश्रुसिंचनानें कीं काय—

सागराला उचंबळून येत होतें. भरती वाढत होती. अशा अवस्थेंत होडी काठाला बिलगली.

* * *

हिराकान्त हा दयाळचा बालमित्र. दोघेही एका शाळेंत होते; दयाळ एकदोन इयत्ता हिराकान्तच्या खालीं होता—आटयापाटयाच्या संघानिमित्त दोघांच्या रोज सायंकाळीं गांठी होत. हें उभयतांच्या दोस्तीचें उगमस्थान.

आईबाप तुटपुंजी पेन्शन घेऊन दयाळच्या शिक्षणास्तव पुण्यास राहिलेले. पुढें वर्षांच्या अन्तरानें अनुक्रमें बाप व आई यांची पांखर अकल्पित गमावल्यामुळें दयाळला आपला अभ्यासक्रम नाइलाजानें सोडून

कोंकणांत चुलतीच्या आश्रयाला जावें लागलें होतें. नोकरीधंदा न मिळाल्यानें चुलतीच्या उत्पन्नाची देखरेख करूनच तो आपल्या तीन बहिणींसह तेथें होता.

मध्यम स्थिति होती हिराकान्ताची. तो स्वभावाचा अतिशय प्रेमळ! दयाळविषयीं त्याला एक प्रकारचा अकृत्रिम ओलावा असे. दारिद्र्याच्या फेऱ्यांत अडकलेल्या दयाळची हिराकान्ताला सहानुभूति वाटे.

हिराकान्त ओव्हरसिअर झाला. लोकलबोर्डाकडे त्याला साधारण मानाची जागाही लाभली. हें कळतांच थोरल्या बहिणीच्या विवाहाच्या चिंतेंत गुरफटलेल्या दयाळनें त्याजपाशीं शब्द टाकला. नेत्रा अगोदर बघितली असल्याने हिराकान्तकडून दयाळला चट्कन अनुमति दिली गेली. हुंडापांडा, निरर्थक खर्च यांच्या भानगडींत न पडतां आवश्यक तो पैसा स्वतः घालून हिराकान्तनें शुभमंगल केलें.

त्याला साठ—सत्तर रुपये दरमहा मिळत व वर्षागणिक ठराविक वाढ होती. परंतु हिराकान्तला पाणी प्यायच्या भांड्यापासून प्रपंचांतल्या जिनसा गोळा करायच्या होत्या. थोरल्या भावाची व आईबापांची त्याला बिलकुल मदत नव्हती; वांटणीचें किंचित् सोनें लाभलें तेवढेंच.

तथापि नेत्राला कशाची उणीव जाणवूं द्यायची नाहीं ही हिराकान्ताची उडी होती. नेत्रा आकर्षक दिसे व तिच्याकडे दृष्टि फेंकली कीं ऐहिक-पारलौकिक उपभोगाचा ठेवाच आपल्या ताब्यांत असल्याची धन्यता हिराकान्तला वाटे.

आईबापांच्या लाडांत बहुतेक वर्षें वाढलेल्या नेत्राचा अल्लडपणा सांसारिक अडथळ्यांनीं अद्याप चेंचला गेला नव्हता.

ती हिराकान्तजवळ कधींमधीं नावेंतून हिंडण्याचा हट्ट धरी.

‘ अन् समज होडी कलंडली—मी पाण्यांत पडलों तर मलाच वर काढायला कुणी हवं. मग मी तुला काय साहाय्य देणार?’

‘असं अभद्र बोलूं नये गडे. नाव उलटते का कधीं? माझा दयाळ नेहमीं नेत असे मला समुद्रावर.’

‘ कुणी शिकवलं त्याला वल्हवायला?’

‘होता एक कामूराव भारप म्हणून आमच्या गांवांत हुशार.’

'आहे का तो? मी येतों सासुरवाडीला न् शिकतों. तुला इतकी आवड आहे तर मला यायलाच पाहिजे ही कला.'

'मग माझा दयाळ नाहीं वाटतं सांगायचा?'

'मला किनई, पाण्याचीं भीतिच बसली आहे लहान वयापासून. दयाळ झाला तरी पोरच. त्यांतून त्याचा स्वभाव एकादी बाब अतिशय जिवाला लावून घ्यायचा; मला कांहीं कमी जास्ती झालं तर आपल्या ताईचं सुख हरवलं—'

'सुरू झालं फिरून अशुभ बोलणं!'

'इथं बोटिंगची व्यवस्था आहे; येतेस?' त्यानें विचारलें.

आधींचें दुश्चिन्हकारक संभाषण आठवून नेत्रानें तिथून हलूंच नये; हिराकान्तनें मग तिला आंजारूनगोंजारून अलेंबलेंच न्यावें.

पण दोघांना एकान्त लाभत नसे. हिराकान्त आपला कुणी तरी स्नेही वल्हें मारण्यासाठीं घेई.

हिराकान्तची फार मनीषा दोघांनीं एकटें एकटें फिरावें अशी.

'सांग ना मला शिकवील तो धारप?' त्यानें एकवार नेत्राला विचारलें.

'तो आतां तिथं नाहीं.'

'मग कुठं गेला?'

'तो मिठागरावर काम करी; बोटीवरचा माल नावेंतून बंदरांत आणी, शेतीचे हें दिवस नाहींत. कोंकणांत पाऊस भरपूर, पण चार महिने पुरेल इतकंहि धड उगवत नाहीं, कामूराव धारपानं एक पाटाची बायकी केली. एकाची दोन पोटं झालीं तेव्हां त्याचं भागेना; गेला बापडा निघून देशा-मुलुखाला.'

असाच एक समयीं नेत्रेची हौस पुरविण्यासाठीं हिराकान्त बोटिंगला गेला; परंतु तुफान वारा काय सुटला;–थोडाच, पण जोरदार पाऊस काय कोसळला!—

लगेच हिराकांत नेत्राला घरीं गेल्याबरोबर म्हणाला 'नेत्रा, माझ्या गळ्याची शपथ!'

'कशाबद्दल?'

'पुन्हा नावेंत बसायचं नाहीं होतां होईस्तवर; कधीं आतांसारखं वादळ झालं, नौका हेलावली, माझ्या सुखाचा तन्मणि—छे—नको असल्या कल्पना! पण सांग ना असं काहीं घडलं तर मी आयुष्य कसं कंठायचं? कोणाच्या तोंडाकडे पाह्यचं!' हिराकान्तनें आपली नजर नेत्रावर स्थिर करीत सकंपतेनें म्हटलें.

'भलत्यासलत्या विचारांना मनांत थारा दिलात तर बघा हं; नाहीं मी पुन्हा बसायची बरं नावेंत! आपल्याबाहेर का मी आहे?'

'तुझे वाटेल ते मनोरथ मी पुरवीन; पण हें वचन तूं कसोशीनं पाळ.'

आणि खरोखरीच हिराकांत आपल्या ऐपतीपलीकडे पत्नीचें कोड-कौतुक पुरवीत नव्हता का?

मंडईतील पैद्या-अबेल्यांची भाजी खरेदी करतांनाही बोरें, जांभळें, कैऱ्या, काकड्या, टोमॅटो-जें त्या मोसमांत मिळेल तें नेत्राकरतां अगत्यानें घेऊन यायचा तो. तिच्या बारीकसारिक आवडीनिवडी हिराकान्ताच्या चांगल्या परिचयाच्या होत्या.

स्त्रियांना जात्याच दागिन्यांचा सोस असतो हें त्याला ठाऊक होतें. त्याला कोणीसें सांगितलें कीं मोहनमाळा फार करतात अलिकडे.

घरांतले वडिलार्जित जुनेपानें डाग होते ते मोडून त्याच्या भरीला कांहीं रक्कम देऊन, हिराकान्तनें नेत्रासाठीं मोहनमाळ तयार करवली.

आताशा नेत्राला महिने गेल्यामुळें घरकाम होत नव्हते. हिराकान्त केवढी तरी मदत करी तिला. नेत्रानें हरकत घेतली तर तो म्हणे, 'तूं माहेरीं चालूं लागशील. मी एकटाच भात पिठलं बनवून खाणार; आतांपर्यंत आई वडील होते मजजवळ;-ते माझ्या थोरल्या भावाकडे उत्तर-हिंदुस्थानांत राहायला गेले न् तूं आलीस; वेळअडचण खानावळींतल्या डब्यांनीं भागवीत होतों आपण; पण सध्यां काटकसर—माझा घरींच जेवायचा बेत तूं गेल्यानंतर....'

'स्वतःचे हाल करूं नयेत गडे—'

'हाल कसले? तुझ्या लक्षांत आहे कांहीं दिवसापूर्वी तूं म्हणालीस तें! हल्लीं बायका मोहनमाळ करीत नाहींत. चन्द्रहाराच्या फारसं कोणीं वाडेला

जात नाहीं; चपलाहार हा दागिना पुष्कळ स्त्रिया घालतात; ती नवी फॅशन. आतां तुला माहेरीं निघायला थोडा अवधी राहिलेला आहे म्हणून; नाहीं तर आतांच मोहनमाळ बदलून वरकड पैसे देऊन चपलाहार केला असता आठनऊ तोळ्यांचा...'

'एवढं मनावर घेऊं नये; माझ्या ओळखीची बाई म्हणाली तें सांगितलं सहज.'

'तूं सुखरूप ये आपल्या बाळाला घेऊन. जमल्यास पहिली मोहनमाळ तशीच ठेवून शिवाय चपलाहार आणूं. तेवढ्याकरतां पैशाच्या बाबतींत कांटेतोलपणानं वागलं पाहिजे.'

दयाळ बहिणीला कोंकणांत न्यायला आला.

'दयाळ, समुद्रावर फिरूं नका बरं' हिराकान्तनें बजावलें, 'हिला वावडंचिवडं खायला देऊं नकोस !—'

'आणि...' मोहनमाळ बारशाला, एरवीं सणावारीं घालायला नेते आहेस ती जपून ठेव, असें त्याला नेत्राला सांगावयाचें होतें.

नेत्रानें सारें समजल्यासारखी मान हालवली.

व...

अरेरे !

दयाळ, तूं हें काय केलंस ? पश्चात्तापानं माणसाचं पातक धुवून निघतें म्हणतात. तूं तर अनुतापाच्या वणव्यांत होरपळत आहेस. कुकल्पनांचीं असंख्य पिशाच्चं तुझ्या मस्तकांत थैमान घालीत आहेत; या पेटत्या चितेंतून तूं शुद्ध होऊन बाहेर येशील ?

हें ऐका दयाळचें नेत्रेपाशीं चाललेलें रुदनः 'ताई, मी गरीब, अगदीं गरीब; हिराकान्तापाशीं तुझ्या विवाहाची बात करतांच त्यानं संमति दिली. त्याचे मजवर केवढे उपकार ! आणखी दोन बहिणी उजवायची जबाबदारी माझ्या शिरावर आहे. हें कसं ग संकट ओढवलं ?'

'दयाळ, मुद्दाम का केलंस हें तूं ? मीच चांडाळीण त्यांच्या सूचनेला न जुमानतां नटून-सजून नावेंत चढलें. मोहनमाळ जाण्यापेक्षां माझ्या प्रतारणेनं ते जास्त विव्हळ होतील; दयाळ, माझ्या आळशिकीचा मोबदला मी सोशीन; तूं खुशाल अस. तुला निस्तेज, चिंतातुर पाहून माझ्या अंतः-

स्थांतल्या वेदना वाढतात रे, दयाळ! तुझा प्रमाद नाहीं. डोहाळतुलीचं कौतुक तूं माजवायला गेलास. कैऱ्या खाल्लया, समुद्रांत संचारलों,–पाण्यानं दगावलं.'

नेत्रा रुद्ध कंठानें म्हणाली.

योग्य काळीं नेत्रा प्रसूत झाली. तिच्या चुलतीनें, तिच्या बहिणींनीं, तिचा भाऊराय दयाळ ह्या सर्वांनीं कित्ती कित्ती लाडिकपणा उधळला नेत्राच्या कन्येवर!

हिराकान्ताचें लिहून आलें कीं लोकलबोर्डाचें तांतडीचें काम असल्या कारणानें रजा मिळत नाहीं.

मुलीचें नांव चपला ठेवा असें कळवलें होतें त्यानें.

हें कळविलें तेव्हां नेत्रा मनाशीं म्हणाली, 'आपल्या चपलाहाराची विस्मृति पडली नाहीं हेंच इकडे दर्शवायचं झालं का?'

चपला ह्या अभिधानानें दयाळचीही चपलाहाराची आठवण टवटवीत बनली—मोहनमाळ—चपलाहार–नेत्रा–अतोनात जांचण्या त्याच्या काळ-जाला टोंचीत होत्या.

दयाळची चुलती, दयाळच्या धाकट्या दोन बहिणी 'चपला–चपला' या संबोधनानें आपल्या भाचीबद्दल अपुर्वाई प्रकट करीत.

वरवर दयाळ शांत दिसे. पण त्याच्या अंतःकरणांतल्या गाभ्यांत कोणची तरी जाणीव तीव्रतेनें सले. बहिणीच्या तळपायाला जो कांटा आपण जबर-दस्तीनें टोंचला, तो उपटण्याला मात्र आपण असमर्थ आहों या व्यंगानें त्याच्या प्रत्येक कृतीला एक तऱ्हेच्या कारुण्याची झील नकळत चिकटलेली होती.

नेत्राला न्यायला तिचे यजमान आले.

सकाळची वेळ होती ती; दयाळ तेव्हां अळूच्या खांचेंत तोंड धूत होता; एका बाजूला विटांच्या चुलीवर पाण्याचें मोठें तपेलें तापत होतें. चुलीत सरपण घालून जाळही तो फुंकीत होता; ठिकठिकाणीं शिवलेल्या लांड्या मळकट धोतराखेरीज त्याच्या अंगावर कांहीं नव्हतें.

हिराकान्तला बघतांच शरमलेल्या नजरेनें त्यानें सौम्य स्मित केलें.

त्याच्या समीप उभा राहून हिराकान्त हंसत म्हणाला, ' अहो सद्गृहस्थ, माझी अटकळ अशी कीं आपण होडी फिरवीत असावेत !'

' हां हां रावसाहेब, अळवाच्या खांचेंत नुकतीच घोड्याची लीद टाकली आहे, तिची घाण येत असेल—चुलींतून धुराचं एंजिन लागलं आहे—इथं थांबूं नका—आणा ती हातांतली बॅग...'

दयाळनें जवळ जवळ हिराकान्तापासची बॅग ओढलीच !

हिराकान्त त्याच्या मागोमाग जात म्हणाला, ' मला नाव चालवायला शिकवणार ना, दयाळ ?'

दयाळ नेत्राच्या खोलीनजीक आला होता. तो उद्गारला, ' वल्हीं मारायचीं म्हणजे व्यायाम असतो खूप खूप.मला आतां समुद्रावर तरंगावंसं वाटत नाहीं. वाटतं खोल खोल जावं. तळ गांठावा. तेथील सगळीं मोतीं-माणकं एकदम वर आणावींत अन् आपल्या तीनही बहिणीमध्यें वैरून टाकावींत. नेत्रा, हे जांवईबुवा, हंस आतां हवी तितकी. मी जातों हं. आज तिघीही बहिणींचीं नहाणीं आहेत. पाणी लवकर तापलं पाहिजे. मला सरपण फोडायचं आहे. आमच्या कोंकणचा रीतिरिवाज. अगोदर जांवयांना गूळपाणी आणतों. म्हशीचं पारडू मेलं. त्याचं भूत करून घेतलं काल. तरीही म्हैस लाथा देते. पण कप भरून ऊन्ह ऊन्ह धारोष्ण दूध काढतोंच जांवईबुवांसाठीं.' दयाळ निघून गेला.

नेत्राची धाकटी बहीण दुर्गा हिनें हिराकान्तमोर गूळपाणी ठेवलें.

जराशानें तिच्या पाठची निर्मला दुधाचा पेला घेऊन आली. दयाळ त्याला फारसा दिसलाच नाहीं.

' कुठं आहे दयाळ ?' हिराकान्तनें नेत्रापाशीं चौकशी करावी.

' बाहेर गेला असेल शेतावर ! भाताची कापणी आहे वाटतं. मला त्यानं जातांना सांगितलं आहे आपलं कांहीं उणं पडूं देऊं नये म्हणून.'

' वाहवा, खासा न्याय ! मी अगदीं थोडा राहणार हें त्याला माहीत आहे, तरी टाळतो.'

' तसं नव्हे; भारी काम असतं त्याला आताशी ' माहेरवाशिणीनंच आपल्या माणसांची तरफदारी करायची असते ना !

हिराकान्त पुण्याला निघतांना—

'नेत्रा, वाटेंत थंडी वाजेल, बाळाला चादरीवरच ठेव—बरोबरच मोहनमाळ घेतलीस...'

दयाळनें टोपी चढवली. त्याची चुलती, त्याच्या दोन बहिणी मोटारी-पर्यंत पोंचवण्यास गेल्या.

मोटारस्टँडवर—

नेत्राची सर्वांत धाकटी बहीण निर्मला बाळाचा पापा घेऊन म्हणाली,

'चपला, पुन्हा ये हं लौकर, लब्बाड, पाहा कशी खिदळते आहे!'

निर्मलेहून थोरली दुर्गा बोलली, 'ताई, बाळाला जप ग बाई. मोटरीनं धुरळा पसरतो, वारा सोसाट्याचा सुटतो. लपेटून ठेव चपलाला.'

नेत्राच्या चुलतीनेंही जिवाभावाचें प्रेमप्रदर्शन केलें.

दयाळ!

शून्य मनस्कतेनें शीळ घालीत उभा होता. अपराध्यासारखी मुद्रा होती त्याची. नेत्राखेरीज कुणाच्या हें ध्यानीं येणार! तो कांहींच बोलत नाहीं; हिराकान्त कदाचित् रागावेल हे जाणून येतांच दयाळला हालवून हिरा-कान्तकडे पाहत ती बोलली,

'दयाळ, होतं आहे का तुला कांहीं—? असा कां वागतोस—? मी चाललें म्हटलं पुण्याला.'

'ये हं ताई; हिराकान्त, नीट असा बरं...चपला हा...' नेत्राच्या खांद्यावरील चपलेकडे बघत कांहींशा लाचार स्वरांत तो उद्गारला.

'काय?' हिराकान्तनें आश्चर्यचकित होऊन म्हटलें.

नेत्राच्या दटावणीच्या नजरेनें आणखी नरमाईत दयाळ हात जोडून बोलला, 'तुमचं सुख बिनसूं नये, माझी ताई उदंड भाग्यांत वावरावी हीच माझी भिकाऱ्याची देवापाशीं याचना. हिराकान्त, माझ्याबद्दल विपरीत वाटून घेऊं नका, गरिबाला अन्तर देऊं नका; याची ओळख ठेवा.'

'तूं गरीब अन् आम्ही काय सात मजली हवेल्या उठवल्या आहेत का रे? हिला घेऊन जायला आलास त्या वेळीं किती खुलास दिलाचा, खेळकर, मनमोकळा होतास; नि आतां—ही कुढी वृत्ति हे टाकून; ही गरीबश्रीमंताची परकेपणाची भाषा माझ्याशीं तरी वापरत जाऊं नकोस हं!'

हिराकान्तानें मायेनें दयाळच्या पाठीवरून हात फिरवून त्याचा निरोप घेतला.

मोटरीची घरघर सुरू होऊन तिला गति येतांच—

'नमस्कार हं ताई' दयाळचा आवाज घोगरा होता; त्याचे डोळे पाण्यानें डबडबले होते.

नेत्रा आल्यानंतर पूर्वीइतका आपला संसार आल्हादरम्य कां असत नाहीं ? त्यांत न्यूनता आहे का कोणची ? हिराकान्ताला गूढ उकलेना.

'उलट प्रथमच्या उत्साहाला बेहोषतेचें स्वरूप यायला नको होतं का ? कारण...दोघांच्या अनिर्वचनीय आनंदाचं द्योतक...चपला...'

हिराकान्ताच्या मनानें कांहीं घेतलेल्या अनुरोधानें तो एक दिवस नेत्राला म्हणाला, 'नेत्रा, तुझ्या वर्तणुकींत संदिग्धतेच्या सूक्ष्म छटा मला कां दिसतात ? मोहनमाळ बदलून चपलाहार घेतला नाहीं, म्हणून का ? माझे पैसे सांठले नाहींत; सायकलवरून रस्ते तपासण्यासाठीं भटकापुरी वगैरे करायची. मी घरीं जेवण करायला यायचा तो म्युनिसिपालिटीचे नळ बंद. गरम गरम स्वैपाक करायला ही मुख्य नड. शिवाय सराव कमी; अर्धकच्चं खावं लागे; मध्यें आजारी होतों. औषधपाण्याला खर्च झाला.'

'मला कळवलं नाहींत तें ?'

'आणि तुझा सुखांतला जीव विषादांत ढकलायचा होय—आपल्या चपलेवरही परिणाम नसता घडला याचा ?' तंतोतंत हेंच तत्त्वज्ञान आपण अनुसरत आहोंत असें नेत्राला वाटे.

हिराकान्तला हृदयांतला कप्पान् कप्पा उकलून दाखवावा ही ऊर्मि सदाकदा तिच्या अन्तरंगांत उसळे; पण—

अज्ञानें आपल्या प्रपंचांतल्या संतोषाची कमतरता लोप पावेल, कां वाढेल ?

सगळी हकीकत हिराकान्तना निवेदली तर—?

दयाळाची काळजी नाहीं का आपल्याला ? त्यावर जर हिराकान्त रुष्ट झाले, त्याच्याहून आपली स्थिति उजवी—पुढंमागं बहिणीच्या नात्यानं त्याला हातभार लावतां येईल आपणाला.

ह्या विचारमालिकेनें भारल्यामुळेंच हिराकान्तची मर्जी बिनसण्याचे प्रसंग ती मोठ्या कष्टानें सहन करी.

कुणाचें बोलावणें आलें तर नेत्रा जायला निघतांक्षणीं हिराकान्तानें आग्रह धरावा, ‘ नेत्रा, मोहनमाळ जा कीं घालून ! ’

‘ नको, जवळ तर जाणार मी. पांच मिनिटांसाठीं कशाला काढा–काढा नि घाला–घाला ! चपलेकडे लक्ष ठेवा हं; आलेच उभ्या–उभ्या जाऊन.’

‘ नावेंत यायचं आहे ! ’ त्यानें कधींकधीं थट्टेनें विचारलेंच तर नेत्रेनें थरारून जबाब द्यावा, ‘ मागची आपली शपथ स्मरणांत आहे ना ! ’

नेत्राच आपल्या उद्गारांत पहिल्याइतकी साधीसुधी, निष्कपट भावना प्रतीत होत नाहीं हें उमगून खजील होई.

दुसऱ्या बाळंतपणाच्या समयीं हिराकान्तचे आईबाप त्याजकडे राहायला आले.

हिराकान्त व नेत्रा यांना अपत्यसुख लाभलें नाहीं. उभयतांच्या मनोरचनेंत आणखी उद्विग्नता पसरली. चपलेवरची त्यांची आपुलकी दुणावली.

नेत्रा लौकरच बाजेवरची उठून सासूला घरकामांत मदत करूं लागली.

‘ अग ए, तुझी मोहनमाळ दाखव ना ग आईला ! ’ एकदां हिराकान्त आईसमक्ष तिला सहजगत्या म्हणाला.

‘ काढीन हं हाताला सवड झाली म्हणजे. ’

पण दिवसावर दिवस लोटले तरी नेत्राच्या हाताला सवड होईना.

सासरा मुलाला उघड म्हणाला, ‘ हिराकान्त, तूं हिला मोहनमाळ माहेरी दिली होती म्हणतोस ना ! हिनं ती बोळपाटली–हिच्या माहेरची गरिबीही आहे–लग्न सुद्धां आपण दुही अंगचं करून घेतलं. मुलींचा माहेरकडे ओढा असतोच. ’

‘ हल्लीं मूल गेल्या कारणानें तिची प्रकृति ढासळली आहे. इथं ओळखी पाळखी मोजक्या असल्यामुळें दागिनें घालून मिरवायचं विशेषसं कारणही पडत नाहीं; तथापि मी तिला पाहीन विचारून युक्तीयुक्तीनं. ’ हिराकान्त म्हणाला.

नेत्राच्या कानावर ही बैठकीच्या खोलींतली बोलाचाली पडली होती.

सासू–सासऱ्यांशीं ती मग विचकत वागूं लागली. विचारांच्या तंद्रीत क्कचित् वेंधळेपणाही घडत असे तिजकडून.

रात्रींचा स्वयंपाक तिजकडे असे. लागोपाठ चार दिवस तिच्या हातून भाजीत तिखट–मीठ ह्यांपैकीं एक विसरूं लागलें. भात करपलेला, नाहीं तर कच्चा होऊं लागला.

सासूबाई एक दिवस मुलादेखता म्हणाल्या, ' सून आतांशा अशी कां वागते ? आम्ही नकोशीं झालों का काय ! मला कल्पना नव्हती इतकी ही असेल ! गोगलगाय नि पोटांत पाय. '

सासऱ्यांनीं पुस्ती जोडली ' त्या थोरल्याची बायकोच बरी आहे. '

एका मुलाच्या पत्नीजवळ असलं कीं दुसऱ्या लेकाच्या कुटुंबाचे गोडवे गाण्याची लकबच असते का वडील माणसांना ?

नेत्रा वैतागून जाई. तिच्या मनांत येई, सारें कळवून टाकावें हिराकान्तना; पण सांगावें तर खरें खरें सांगायला हवें. आपण हिराकांतची आशा झिडकारून समुद्रावर गेलों, तेथें कैरी खाल्ली, हा प्रकार हिराकान्तला आपोआप समजेल. मोहनमाळ गमावण्याच्या दुःखानें, त्यांच्या विश्वासाला आपण अपात्र ठरलों याच्या, केवढ्या यातना होतील त्यांना.

हिराकान्त दयाळला गय करतील ? पैशासाठीं, दागदागिन्यांसाठीं चिरंजीवानें बापाच्या मानगुटीं बसावें असें चमत्कारिक युग अवतरलेलें. कुणाचा काय भरंवसा !

गरिबाला मनुष्यबलाची फार गरज असते. दयाळ गरीब–आपला बंधु स्वभावानें भाबडा–दोन बहिणींच्या विवाहाच्या संगिनी त्याच्या उरावर लटकत्या–मिळकत काय ? फक्त शेत...तेंही चुलतीचे.

चाललंय् हें ठीक आहे.

ती सासू–सासऱ्यांना बोले, पण मर्यादेनें. आणि कृतींत त्यांचे जिथल्या तेथं होऊं देण्यांत तिची मुळींच कसूर नसे.

म्हातारा–म्हातारी म्हणत, ' पोरगी मर्यादशील आहे. पण नवऱ्याला दाबांत ठेवलं आहे तिनं. त्याला मोहनमाळेबद्दल जरासुद्धां पत्ता लागूं देत नाहीं ही. '

मध्यंतरी लोकलबोर्डाचें फिरतीचें काम निघालें. नेत्रा व चपला यांना

घेऊन आणें जेवणाऱ्या सोईच्या दृष्टीनें हिराकान्तला आवश्यक होतें. सासू–सासरें दक्षिणहिंदुस्थानांतल्या मुलांकडून उत्तर–हिंदुस्थानांतल्या लेकाकडे निघून गेले.

दयाळ केव्हां तरी येईल ही नेत्रेची अपेक्षा. लग्नानंतर एक भाऊबीज झाली त्याला दयाळ आला होता.

ह्या भाऊबीजेला त्याचे येणेंबिणें, चिठीचपाटी, कांहीं नाहीं.

नेत्रानें स्वतःचें खुशालीचें पत्र रवाना केलें. दयाळची काळजी वाटते, त्याची तावडतोब खबर कळवावी असें लिहून धाडलें होतें तिनें.

उलट उत्तर आलें, त्यांतला मजकूर, ' तुला वाईट वाटेल म्हणून मुद्दाम कळवलें नाहीं. तूं गेलीस त्याच्या दुसऱ्या दिवशीच दयाळ येथून नाहींसा झाला. खूप तपास केला–शोध नाही. मी व निर्मला काकूंजवळ असतो. दयाळची काळजी आम्हाला फार वाटते. काकूही आतां थकली आहे. तोकडे शेत; रुटूखुटू प्रपंच चालला आहे; बाकी सर्व आनंदरूप आहे. चपलला आशिर्वाद वगैरे वगैरे.

दुर्गा '

नेत्रानें दुर्गाकरितां स्थळें पाहण्यास प्रारंभ केला.

हिराकान्तानें पुष्कळ कष्ट घेतले. चार महिने दुर्गाला पुण्यांत ठेवली होती.

स्वतः घस सोसून हिराकांतनें दुर्गेचें लग्न तडीला नेलें.

आणखी सहा वर्षांनीं—

आपल्या सर्वांत धाकट्या बहिणीचा—निर्मलेचा विवाहहि नेत्रानें पुढाकार घेऊन केला.

अद्याप दयाळचा मागमूस नव्हता. नेत्रा सारखी त्याची आठवण काढी.

हिराकान्ताला अलीकडे शंका येऊं लागली, हिला माहेरचा ओढा आहे म्हणून.

पण तो उच्चार काढीत नसे या बाबतींत. मोहनमाळेसंबंधीं त्यानें चकार शब्दानेंही जिज्ञासा दर्शवली नाहीं.

कारण—

स्वतः हिराकान्त होता पोळलेला–चपलेच्या पाठीवर मूलच जगेना.

चार–पांच अपत्यें काळानें हिरावून नेलेलीं. नेत्रा व हिराकान्त हळवीं बनलीं होतीं.

हिराकान्त म्हणे, ‘ चपला हाच आपला दागिना; चपला हेंच आपलें ब्रह्मांड. ’

नेत्रानें अजून तरी मोहनमाळेची गोष्ट हिराकान्ताला सांगावी कीं नाहीं?

पण तिला वाटे ‘ न जाणो, दयाळ परत येईल, हिराकान्त कंत्राटें घेतात लोकलबोर्डाकडचीं; दयाळला–माझ्या पाठोपाठ आईच्या उदरीं आलेल्या माझ्या दयाळला; देतील ते कुठें तरी डकवून...’

* * *

हिराकान्ताच्या खटपटीनेंच पावसाळ्यांत ज्या ज्या गांवांत नावांनीं रहदारी करण्याची पाळी येते, तिथें तिथें पूल बांधण्याबद्दलचा कायदा लोकलबोर्डाच्या सभेत पास झाला होता.

अशाच एका गांवच्या पुलाबाबत त्यानें खर्चाची मंजुरी मिळविली.

नाव ठेवायचे मक्ते द्यावे लागत. या मक्त्याचे जे सातशें–आठशें रुपये दरसाल येतील, त्याच्या दुप्पट नौकेची दुरुस्ती ठेवण्यांत लोकलबोर्डाचा खर्च होतो; तसें न केलें तर लोकांच्या जीवाला धक्का पोहोंचण्याचा संभव असतो असें हिराकान्ताचे म्हणणें असे.

त्या गांवीं पावसाळ्यांत जायचें ठरलें. वर्षभर पुलाच्या कामासाठीं हिराकान्तला राहावे लागणार होतें. पाण्याच्या पुराच्या मानानें पुलाची उंची ठरवायची असल्यानें, तो पावसाळ्यांत निघणार होता.

चपला आठ वर्षांची, तिला बरोबर घेऊन तिथेंच मराठी शाळेंत गुदरावी असें ठरलें.

मोटरींतून हिराकान्त सहकुटुंब उतरला; नंतर बैलगाडीचा प्रवास. तदनंतर नावेंत बसायचें.

‘ कोण, कामूराव धारप ! !’ नेत्रा नावाड्याला पाहून अचंब्यानें म्हणाली.

‘ तुम्ही कोण ? ’ वयस्क नावाडी कोणताच बोध न होऊन म्हणाला.

‘ मोठं माणूस पुष्कळ काळानें दिसलं तरी हेरतां येतें. चिमुरडीं मुलें

थोराड झालीं कीं ओळखण्याची पंचाईत उत्पन्न होते. तुम्हीं दयाळला वल्हवायला शिकवलंत ना कोंकणांत समुद्रावर ? त्याची मी बहीण. '

' खरंच ? कुठं आहे दयाळ ? मोठं लागट, मृदु मनाचं पोर होतं तें...'

' कित्येक वर्षं लोटलीं. खबर नाहीं हो त्याची ! ' नेत्राच्या पापण्या ओलावल्या.

नाव सुरू झाली.

' हा मुलगा कोण ? ' हिराकान्तानें कामूरावजवळ बसलेल्या दहाबारा वर्षांच्या छोकऱ्याकडे हस्तक्षेप करून सहजासहजीं विचारलें.

' हा माझा मुलगा—पाटाची बायको केली तिच्यापासून झालेला एवढाच मुलगा; वल्हवायला शिकवतों. आम्हा म्हाताऱ्यांना काठी होईल. '

' नका त्या भानगडींत गुंतूं ! ' हिराकान्त हंसून म्हणाला, ' आम्ही आतां पुलाचं काम सुरू करणार आहों. पुढच्या पावसाळ्यांत नावेची नाहीं गरज. '

' हायरे दुर्दैवा ! '

' काय झालं कामूराव ? ' नेत्रानें विचारलें.

' अहो, हेंच आमचं उपजीविकेचं साधन. दरसाल मी नावेचा मक्ता घेतों. बायकोला घेऊन मी पोटासाठीं कोंकण सोडलं. सतरा धंदे केले. रस्ते दुरुस्ती, नंतर बैलगाडी ठेवली होती; आगगाडया आल्या तशी स्टेशनवर हमाली केली, मोटरीमुळं रेल्वेच्या धंद्याला अवकळा आली; शेवटीं हा उदीम पत्करला; यावरहि धाड ! '

जगतात जिकडेतिकडे खिन्न वदनें पाहून कंटाळलेली, बंधुप्रेमाला आंचवलेली नेत्रा, चपला व कामुरावाचा मुलगा यांमधील संवाद तन्मयतेनें ऐकत होती.

' तुझं नांव काय ? ' चपलेनें पृच्छा केली.

' मुकुंदा ' तो मुलगा उत्तरला.

' उद्यां खेळायला येशील आमच्याकडे ? '

' जरूर ! '

‘ तूं शाळेत जातोस का?’

‘हो. तुलाही नेत जाईन रोज!’

‘कितवींत?’

जे सुख मिळावें अशी दुर्दम्य इच्छा असून देखील आपणाला मिळत नाहीं, ते दृष्टिगोचर जरी झालें तरी तृप्तता वाटते.

बंधुप्रीतिपायीं नेत्रानें थोडा का स्वार्थत्याग केला होता?—पतीशीं वागतांनासुद्धां प्रतारणेच्या सूक्ष्म रेषा तिनें निर्माण केल्या. नवरा हें स्त्रीचें निदान हिंदु स्त्रीचें—जीवनसर्वस्व—हिराकान्ताची व तिची वृत्तीही सुदैवानें जुळत होती—तरी त्यांतही असमाधानाचे तंतु तिनें शिल्लक राखले—कां? तर दयाळकरितां. दुर्गा व निर्मला यांच्याहून तिलाच त्याचा अधिक लळा! कारण लहानपणीं दोघेजण एकत्र नाचलींखेळलेलीं—भांडलेलीं—हो भांडलेली!!

दयाळनें तर नेत्राच्या आयुष्यांतून कायमचा पोबारा केला.

ज्या बंधुप्रेमासाठीं नेत्रा हपापली होती, ते तिला मुकुंद चपला यांच्यांत आढळूं शकलें.

पहिल्याच भेटीला मुकुंदानें चपलेला गाभुळलेल्या चिंचा आणल्या होत्या खिसा भरभरून.

आपण बाभळीचा डिंक काढतों,—बागांतून फळें पळवून ती मोटरींत विकतों, परस्पर पैसे खर्चून खाऊ आणतों;

अगदीं असलींच हितगुजें नव्हता दयाळ आपणाशीं करीत?

‘तूं काय खेळणार?’ मुकुंदानें विचारलें.

‘ए सागरगोटे तूं शीक, मला बेफाम आवडतात खेळायला’ चपला बालिशतेनें म्हणाली.

—आणि वर्षभर चपला व मुकुंद यांच्यामध्यें आपल्या भावाबरोबर घडलेले बालपणचे प्रसंगच आपण पहात आहोत असें नेत्राला पदोपदीं भासलें.

—खेडेगांवांत नेत्रा राहिली नव्हती असें नाहीं; पण सध्यां तिला फारच ओकेओकें वाटे; शहरांत तिच्या वाड्यांतल्या शेजारणी गोष्टी-

वेल्हाळ होत्या, गप्पांत रिकामा वेळ हां हां म्हणतां जाई; इथें सगळीं कुणब्यांचीं माणसे! तीं आपापल्या व्यवसायांत निमग्न.

तासतास ती एका वस्तूकडे पाहत विचारांमध्यें घालवी. तिचा मनस्ताप फोंफावत होता. परमार्थात ती रमूं लागली. आपल्या मनाचा दाह शमण्यास हेंच एकमेव साधन आहे अशी नेत्राची अनुभवानें खातरजमा होत चालली.

तिची प्रकृति हल्लक झालेली, तिच्या प्रवृत्ति हळुवार बनलेल्या, उठल्या सुटल्या दयाळची स्मृति उगाळायचीं, चपलेपाठच्या भावंडांना आठवून आंसवें ढाळायचीं.

हिराकान्त स्वतः दुःखी! नेत्राचें सांत्वन करतां करतां त्याची हद्द व्हायची! घरांतल्या कुच्या वातावरणानें तो संत्रस्त झाला होता; आई-बापांना बोलवायची त्याची मनीषा होती, पण नेत्राचा त्याला होकार-नकार कांहींच मिळत नव्हता; बिचारा हिराकांत आपल्या उद्योगांत चूर होऊन तिथे समाधान शोधण्याचा यत्न करीत होता.

नेत्रा, जवळच दामोदराचें देऊळ होतें, त्या जागीं करमले नाहीं तर जाऊन बसे; देवाच्या नामस्मरणांत ती दंग होई; मात्र खरेंखुरें अंतःसमाधान तिला चपला व मुकुंद यांचा निर्व्याज जिव्हाळा पाहून होत होतें यांत संशय नाहीं. हेंच तिच्या आत्यंतिक शोकाच्या होमकुंडानें तापत असलेल्या कढत कढत देहरूपी उकळणाऱ्या पाण्यांतील विसण. तोच तिच्या दग्ध अंतःपटलावरील चंदनाचा लेप.

यंदाची दिपवाळी थाटांत करण्याची नेत्राची उमेद होती.

मुकुंदाजवळच आपण पैसे द्यायचे व त्याला चपलेला ओवाळणी घालायला सांगायचें अशी नेत्रानें आंखलेली योजना.

तिनें दुर्गा निर्मला यांनाही रहायला साक्षोपाचें निमंत्रण धाडलें; पण—

दोन्ही घरची मंडळी सासुरवाडी हौसेजोगती मिळाली नाहीं, बहिणीनें पुढें होऊन कार्य केलें; पण जांवयाचें कोडकौतुक पुरवलें नाहीं अशा रुसव्यानें फुरंगटलेली.

वस्तुतः नेत्रानें दुर्गाच्या नवऱ्याला सोन्याच्या गुंडया दिल्या होत्या; निर्मलेच्या नवऱ्याला चांदीचें तांब्या-भांडें दिलें. जांवयाला तीन-चार

वेळां जेवायला बोलावलें तिनें. संक्रान्तीला हलव्याच्या हाराची भेट पाठविली.

तरीही सासरच्या माणसांची कुरकूर चालू आहे व त्यामुळें दुर्गा व निर्मला येऊं शकणार नाहींत याचा अंधुक तर्क नेत्रेला होताच.

भाऊबीजेची रात्र. चांदणें टिपूर पडलें होतें. नदी पुरानें भरून वाहत होती.

चपलेनें मुकुंदाच्या सांगीवरूनच होडींत बसण्याचा हट्ट धरला.

मुलें गेल्याच्या दारुण दुःखानें ग्रासलेलें आई-बाप पंखाखालच्या एकट्या चिमण्या पाखरासाठीं जीवसुद्धां टिपतील!

कामूराव धारपासारखा निष्णात नावाडी. पुलाचें काम थोडेंच राहिलें होतें. त्यावरून रहदारी चालणार हें नक्की होतें. रोजिंदारी मिळवण्याचे कामूराव धारपाचे हेंच अखेरअखेरचे दिवस.

'रडूं नकोस अशी! तुझ्यामागं भावांचा—दयाळचा घोर आहे. मलासुद्धां दुःखाचे उमाळे येत नाहींत का? पण मी संयमन करतो. तूंही आवर शोक.' हिराकान्त पत्नीच्या डोळ्यांतले अश्रु थबकविण्याची शिकस्त करीत होता.

'मी ओवाळणार मुकुंदाला' चपला आनंदानें बहरून म्हणत होती. आजपर्यंत नेत्राची भाऊबीज मानलेल्या भावामार्फत साजरी करावी असें नेत्राला नेहमीं वाटे; पण—

वाड्यांतल्या शेजारणीपाजारणींचीं मुक्ताफळें एकदां तिनें ऐकलीं होतीं. 'त्या नेत्राताईच्या चपलेची पाठच वाईट; मूल मारून टाकते; तुमच्या खेपांना तुम्ही नेत्राताईच्याकडची वाज अगर पाळणा नेऊं नका अं मूल जिवन्त नांदावें अशी इच्छा असेल तर...' असल्या कांक्षाखोर ओळखीच्या शेजाऱ्यांशीं भाऊबीजेनें नातीं निर्माण करून आपल्या दुर्दैवाचा संपर्क त्याना कल्पनेनेंसुद्धां पोंचूं देऊं नये हा नेत्राचा निग्रह होता.

तिच्या बहिणीला—दुर्गाला—मुलगा झाला, तरी दीरमामंजींच्या धाकांतले दुर्गेचें आचरण—तिला दिवाळीला चपलाला बोलावण्याचा धीर होईना. निर्मलेला तर सासरहून नेत्राकडे आयला कुणी परवानगी देतच नव्हते.

—एकंदरींत चपलेला यंदाच भाऊ मिळून तिची पहिली भाऊबीज साजरी व्हायची होती.

—‘ ओवाळ हं छकुल्या...नावेतून उतरल्यानंतर करूं ओवाळणी...’ नेत्रानें चपलेला समजाविलें.

‘ हं, मुकुंदा माझा डाव ’ ती मुकुंदाच्या हातांतील सागरगोटे हिसकून घेत म्हणाली.

सागरगोट्यांचा नऊखऊचा खेळ चालला होता उभयतांमध्यें.

चपलेनें एक सागरगोटा झेलला;

पण दुसरा—

तिच्या हातून निसटून नदींत पडला.

ती वांकली—नावेच्या आंचक्यांची जोड मिळाली.

गगनभेदी किंकाळी सर्वांच्या कानावर आली !

होडी मध्यावर—

चपलेची आरोळी नेत्राच्या हृदयांत रुतली. अंगांत वारें शिरल्याप्रमाणें तिनें हातवारे केलें; डोळे पांढरे केले—नदीच्या पाण्याकडे तिनें झांप टाकली.

हिराकान्तचें तोंड चिमणीएवढें झालें होतें.

त्याचें कर्तव्य अंतरांतील खळाळी दडपून संयतेनें पत्नीला घट्ट पकडून ठेवणें हें होतें.

त्यानें तें बजावलें.

कामूराव होडीवरचा हलेल तर विलक्षण कष्टी मनःस्थितींतल्या हिराकान्त आणि नेत्रा ह्या जोडप्याचे प्राण केव्हां अडचणींत ढकलले जातील याचा नेम नव्हता.

मुकुंदानें चपलेच्या पठोपाठ उडी झोकली होती !

नाव सपाट्यांत किनाऱ्याला वल्हवून मग नदींत घुसण्याचें कामुरावानें ठरवलें.

याच वेळीं विरुद्ध दिशेच्या कांठांवरून ‘नाव वळव’ असें घसा खरडून कोणसें ओरडत होतें.

मुकुंदा पाहात होता. त्या कोवळ्या बालकाला पाण्याच्या भोवऱ्यांत सांपडलेल्या चपलाला सावरणें जमलें नाहीं.

कामूरावानें खूप शोध केला व अखेरीला चपलेचें—नेत्राच्या राजस्त्रिच्या मुलीचें—धड वर काढलें.

पलीकडच्या कांठावर नावाड्याच्या नांवानें कंठशोष करणारा माणूस होडी येत नाही हें बघून पाण्यांत शिरला. पोहत पोहत तो ऐलतीरावर आला.

' ताई—' हिराकान्तनें धरून ठेवलेल्या आपल्या बहिणीला तो गदगदा हलवीत म्हणाला.

' चपला ! ' कामूरावानें आणलेल्या गतप्राण चपलेकडे झेप टाकीत हिराकान्त आक्रोशला.

नेत्रेचें मस्तक बधिर झालें होतें; डोळे विस्फारीत करून ती पाहत होती; तिचे देहभान हरपलें होतें.

रडून रडून तर तिचीं बुब्बुळें शुष्क बनलेलींच होतीं.

' ताई, बोलत कां ग नाहींस ? ' दयाळ स्फुंदस्फुंदून म्हणाला, ' माझे भिक्षेकऱ्यासारखे कपडे पाहून तुला वीट आला माझा ? आज भाऊबीज, मीं पळी—झारा हातांत घेतला; वाढपी आचारी झालों...मोलमजुरी, अज्ञात राहून गडी राबतात तसे कष्ट केले; मध्यम स्थितींतल्या माणसाला हलकं काम करतांना वाटणारी लज्जा गुंडाळली, उपास तापास काढलें...आज ओंवाळायचा दिवस. धडपडत तुझ्याकडे—माझ्या ताईकडे—तिचा शोध काढीत धांवतच आलों. हा घे चपलाहार ! ' दयाळच्या फाटक्या लक्तऱ्यांतून एक मौल्यवान् जिन्नस निघाला !

'नेत्रा...आपली चपला...' हिराकान्त करुण रुदन करीत चपलेच्या निर्जीव शरीराचे पटापट मुके घेत म्हणाला !

मुकुंदा घाबरटपणानें कामूरावाच्या अंगावर रेलून हुंदके देत होता. एकंदर प्रकार त्याला पाहवत नव्हता !

म्हातारा कामूराव घारप चपलेच्या देहाकडे बोट रोखीत गहिंवरानें दाटून बोलला ' दयाळ, ह्या दोघांची ही लाडकी लेक—चपला...'

' कोण, कामूराव घारप...चपला...माझ्या नेत्राची चपला ही...'

तिच्या गळ्यांत चपलहार घालीत दयाळ ओरडला, ‘ चपला...चपला चपलाहार...दोघांना बरोबरच मूठमाती द्या...हिराकान्त...ताई...काय सर्वांनींच माझ्याशीं गडी फू केली ! हिराकान्त...ताई...ताई अबोला धरलास...चपला, तूं तरी कठोर होऊं नकोस. तुझ्या आईला सांग, म्हणावं दयाळवर दया दाखव; कोपू नकोस. ’

दयाळच्या हृदयाला एकंदर प्रकार स्पर्शून गेला. त्याला मूर्च्छना आली व इत:पर फीट्स येण्याची त्याला जन्माची व्याधि जडली. त्याच्या आयुष्यांतील ही पहिली फीट, त्याचें डोकें पाण्यांत पडल्यामुळें लौकरच निमाली. दयाळ सावध झाला.

म्हातारा कामूराव धापा–सुस्कारे टाकीत मुकुंदाला थोपटीत म्हणत होता. ‘ हिराकान्त, तुमची पोर ही पुलाचा बळी तर नव्हे ! तरी मी थक्क झालों होतों. पूल होत आला तरी एकहीजण दुखावलं नाहीं ! ’ मुलं न जगणे व पत्नीचा उदासवाणा वर्तनक्रम या दैवी आपत्तींनीं हिराकान्तला अत्यन्त श्रद्धावान् केलें होतें. कामूरावाचे शब्द कर्णपथावर आदळतांच भयाकुल चित्तानें आसऱ्यासाठीं तो पत्नीकडे धांवला.

‘ अशी कां ग बघतेस खुळ्यासारखी ? चपला गेली. हा तुझा बंधुराज तुझा भाऊराय चपला–चपलचा आत्मा कुडींत नाहीं ? तिच्या गळ्याभोंवती यमपाश...’

नेत्राच्या बधिर आंतड्यांत जीवनांश शिरला.

‘ ताई...मी...मी...तो चपलाहार...’ दयाळ अडखळला.

भाऊ भेटला याची आनंदातिशयता व चपलेच्या वियोगाचा शोकावेग यांनीं नेत्राच्या रुदनशक्तीच्या तीक्ष्ण अघातांनीं आधींच खुळे बनलेले बंध तट्दिशीं तुटले.

‘ हिराकान्त....माझा दयाळ....चपला....चपलाहार....’ इत्यादि शब्दांनीं तिच्या मेंदूत निरंतरची वस्ति केली.

‘ दयाळ, मी कशाच्या आधारावर जगायचं यापुढं ?’ असहाय्यतेने हिराकान्त ढसढसा रडूं लागला.

‘ ताई ! ’ दयाळनें घाबऱ्या घाबऱ्या हांक मारली.

नेत्रा वेडी झाली होती. तिची बडबड चालू होती,

‘ हिराकान्त, तुम्ही देवमाणूस, भावाबहिणीचं बरं व्हावे म्हणून तुमच्या प्रापंचिक सौख्याला मीं ओहोटी लावली. पोटच्या गोळ्यांना दुरावल्यानं तुमचं व माझे मन एकाच दुःखानं व्यापलेलं होतं तरी तुमच्या व्यक्तींत माझं व्यक्तित्व मी मिसळलं नाहीं. माझा दयाळ—मोहनमाळ—चपला—चपलाहार—। ! ! ’

*

*

# फोनोग्राफ : : : ३

'म्हटलं एक वस्तू आणाल का ?'

'कोणती ?'

'अंऽ अंऽऽ...कांहीं नाहीं'

'म्हणजे ? याचा अर्थ काय ? कसली वस्तू हवी आहे तुला ?'

'फोनो घ्यावा आपल्याला,' एवढें वेणू बोलायचा अवकाश—

'हाः हाः' मोठमोठयानें हंसत जयंत म्हणाला, 'आणखी नको कां कांहीं ? जुन्या बायकांना दागिन्यांचा सोस होता. हल्ली नवीनच हौसा पुढें येत चालल्या आहेत. फोनो—बाजाची पेटी...हिंडायला मोटार ! हो, मिळूंच लागलं माणसाला !...वाडयांतल्या सावित्रीबाईच्या घरीं फोनो आहे. तिथें जातेसच तूं कधींमधीं गाणें ऐकायला ! अग, लक्षांत घे, आपण

गरीब. आताशीं कुठें चाकरी लागून नीटपणें संसारास सुरुवात झालेली. —लाभणाऱ्या तीस रुपयांत मुलेंबाळें नाहींत तोंपर्यंत थोडी शिल्लक तरी राहणें शक्य आहे, पुढें ती आपणास उपयोगी पडेल. कां सध्यांच दिवाळखोर बनून ह्या दहा रुपये भाड्याच्या दोन खोल्या, उंची फरनिचर, महागाईच्या शोभिवंत चिजा, अशा थाटानें सजवायच्या आहेत...'

'जाऊं दे मेलं! सहज बोलून गेलें मी—'

'विचार कर तूं याचा मनाशीं. मला अद्याप एल् एल्. बी ची दुसरी परीक्षा द्यायची आहे. पगाराच्या रकमेंत मी शिकवण्या धरून भर घालणार नि तो खर्च भागविणार कसाबसा. माझा सोबती त्रिविक्रम लग्न न केल्यानें किती सुखी आहे...छेः या सांसारिक भानगडी...खरोखरच तुझी इच्छा असेल तर घेतों फोनोग्राफ...'

'नको. उगीच भलत्या गोष्टीच वाथंग...'

'शिवाय तुला माहीत आहे ? फोनो घरांत आला कीं पिना वारंवार खरेदी कराव्या लागणार—प्लेटींचा खर्च ! रोज नवीन गाणें निघायचें आणि तें तुला हवेहवेसें वाटायचें...'

'मग काय हो ! त्या सावित्रीबाईचें तरी कसें निभत असेल ! तिच्या यजमानाला महिन्याच्या—कांठी चाळीस रुपये तर मिळतात ! अवांतर कांहीं नाहीं. खेरीज पदरीं तीन मुलें !! पण बडेजाव पहा. नवऱ्याचे परीटघडीचे कपडे—सावित्रीबाई कधीं मंडईत गेल्या कीं रुपया दीड रुपयांचा बाजार केल्यावांचून यायच्या नाहींत ! पाहिजे तें फालतुक सामान चैनीखातर आणतील. मी एकदां दोनदां बघितलें व त्यांच्या संगतीनें बाजारांत जाणेंच टाकलें. आपल्याला घ्यायचा असतो पैश्या अधेल्याचा जिन्नस ! त्यांत दुसऱ्याला हलके लेखण्याचा सावित्रीबाईचा स्वभाव. गेल्या सालीच या वाड्यांत राहायला आल्या. हळदीकुंकवाला वीस रुपये खर्च केला—कुठल्या कुठल्या बायका बोलावल्या होत्या !! आपले हळदीकुंकू छोटें झालें म्हणून माझा उपहास केलाच त्यांनीं जरासा ! ! परवां फोनोच्या बाबतींतहि हेंच...'

'काय ?'

'मी त्यांना सहज एक प्लेट लावा असें म्हणायला गेलें. त्या बोलल्या

' तुम्ही घ्या कीं फोनो एक ! सांगा घरच्या माणसांना. बाकी तुमच्या मनांत असतें तर उशीर नव्हता फोनो यायला; पण तुम्ही पडलां व्यवहारदक्ष...'

'—असं म्हणाल्या त्या ! '

जयंताच्या मनाला लागली ही गोष्ट. त्यानें स्तब्धतेनेंच उरलेसुरलें जेवण आटोपलें.

एल् एल्. बी. ची पहिली परीक्षा उतरल्यावर शिक्षण पुढें चालवणें अशक्य झाल्यामुळें जयंतानें एका निमसरकारी हायस्कुलांत मास्तरची नोकरी धरली होती. आज सुटीचा वार असल्याकारणानें आपल्या पत्नीशीं बोलत चालत तो दुपारचें भोजन उरकीत होता.

—पण त्यावेळीं त्याच्या अंतरंगांत बोंचण्यासारखी बाब घडली.

खरें पाहिलें तर वेणू जे फोनोग्राफसंबंधीं जयंतजवळ बोलली ते लगेच ती विसरली देखील ! तथापि स्वत:च्या प्रेमातल्या व्यक्तीनें पुसट दर्शविलेली आकांक्षाहि अपुरी राहूं नये, असें जयंताच्या स्वभावधर्माला वाटे.

—फोनोग्राफच्या किंमती सुद्धां त्याला धड ठाऊक नव्हत्या. त्याच दिवशी संध्याकाळीं निकडीचे उद्योग बाजूस सारून त्यानें फोनोग्राफचे दरांची वास्तपुस्त केली.

एकंदर चौकशी झाल्यावर जयंताचे धाबे दणाणलें. अगदीं किमानपक्षीं पन्नास साठ रुपये तरी पाहिजे होतेच.

' एका चैनीच्या अनवश्यक वस्तूसाठीं कुठून उभे करायचे एवढे पैसे ! एल् एल्. बी व्हायचे, स्वतंत्र वकिलीची सनद घ्यायची—कां आपला मार्ग सोडून नसत्या फंदांत द्रव्य गमवायचे...'

—याच समयीं जयंताला सावित्रीबाईच्या कुटुंबांत अवघ्या चाळीस रुपयामध्यें इतके भपकेदार खर्च कसे चालतात याचें नवल वाटलें.

—फिरून फोनोग्राफच्या विचाराकडे त्याचें लक्ष वळलें.

असल्या भारी दराची जिन्नस घेऊं नये, असें जयंताला वाटलें. तथापि त्याचें भावनाशील अंत:करण ! बायकोनें एकवार मन:पूर्वक व्यक्त केलेली इच्छा अपुरी राहूं नये—असली जयंताची वृत्ति...

—अखेरी त्याचा जो जिवाभावाचा सुहृद होता, त्याची ह्या कोड्यांतून सुटण्यासाठीं खास गांठ घेण्याचें जयंतानें ठरवलें—

—राजकारणांत पडून भाईंत्ववादाकडे झुकलेली, सडा फटिंग अशी त्रिविक्रम ही व्यक्ति होती—

‘ मग कायरे, घ्यावा कां नाहीं ग्रामोफोन ? ’ जयंतानें बोलणीं निघतां निघतां सवाल टाकला.

‘ तुझ्या पत्नीची मनीषा आहे. तुलाहि संगीत अप्रिय नाहीं. मला ठाऊक आहे......’

‘ हो. पण पैसा...’

‘ मजुरालासुद्धां करमणुकीची आवश्यकता आहे,पण ती परवडत नाहीं...’

‘ हमाल शेतकऱ्यासंबंधीं अवाक्षर सांगू नकोस. मी आपला प्रापंचिक...’

‘ आपण सगळेच मध्यमवर्गीय आहोंत, ’ त्रिविक्रम बोलला. ‘ मध्यमवर्गांतला प्रत्येक इसम पैशाचा तुटवडा व स्वाभिमान यांच्या कचाटींत आज अडकलेला आहे. एकीकडे दरिद्री अवस्था तर दुसरीकडे आपली आबादीआबाद आहे हें दर्शविण्याची पारंपारिक प्रवृत्ति ह्यांच्या ओढाताणींत सांप्रत मध्यमवर्ग काळजीनें खंगून गेला आहे...’

‘ मी ग्रामोफोन घेऊन नसती चैन करूं नये...’

‘ छे: छे:, वायफळ षोक कशाचा यांत ! माणसाला अन्नाची जितकी गरज आहे तितकीच करमणुकीच्या साधनांचीहि आहे. वाद इथें येतो कीं श्रीमंतांना ती मुबलक मिळतात, गरिबांना व तुम्हांआम्हासारख्या मध्यमवर्गीयांना तीं लाभत नाहींत. मजूर खाकाबगला तरी वर करतात. हरएक पांढरपेशानें अशीच आपली दुःस्थिति चव्हाट्यावर मांडून जास्त पैसा कमावण्याची बौद्धिक पात्रता असतांही चिंताग्रस्त जीवित आपण कां कंठतों याचा सूक्ष्म चित्तानें अभ्यास केला तर चालू समाज घडीच आपणास ढोंगी बनवते हें त्यांना आढळेल. ह्या सोंगबाजीला तोंड फुटायला हवें...’

‘ त्रिविक्रम, मी फोनोग्राफ खरेदी करावा कीं नाहीं याबद्दल निसंदिग्ध मनानें काय तें मत दे...’

‘ हें बघ जयंत, तुजकरतां आडगिन्हाइकी फोनो मी स्वस्तांत पाहीन. मध्यस्थीनें चांगलें मशीन थोडक्यांत...’

‘ अच्छा, तुझ्या ओळखीही आहेत पुष्कळ. आढळांत आलें कीं जरूर सांग. तुझी वाचाळपणाची रेकॉर्ड ऐकायला मला सवड नाहीं. रागावूं नकोस.’

वर्ष सरत आलें. जयंत एल् एल्. बी ची दुसरी परीक्षा उत्तीर्ण झाला. सांप्रत त्याच्यापुढें वकिली करावी कीं आहे तीच नोकरी चालूं ठेवावी हा प्रश्न होता.

ज्याची जयंत जेव्हां तेव्हां मुलाखत घेत असे तो त्याचा मित्र त्रिविक्रम सध्यां दौऱ्यावर गेला होता.

—अचानक भेटला तो एक दिवस वाटेंत—

'काय भाई!' असें म्हणून जयंतानें त्यास स्वतःपुढील पेंच निवेदला.

'हात्तुझी, मास्तरकीही नको, कज्जेदलाली पण नको!! तूं आपला संपादक हो! एक पत्र काढ! आमच्या पक्षाचा प्रचार कर, अन् त्याच वर्तमानपत्रांत 'फोनोग्राफ आड गिऱ्हाइकी, सवलतीच्या भावांत पाहिजे' अशी जाहिरात दे,' त्रिविक्रम हास्यवृत्ति धारण करून म्हणाला.

'मी आपला कुटुंबवत्सल माणूस—आजची बहुतेक वृत्तपत्रें तोट्यांत चालतात असें तूंच केव्हां तरी बोलला होतास—छानपैकीं उपदेश आहे... जयंत त्याला दंडवत ठोकीत उद्‍गारला.

'जयंत, माझ्या कोणी स्नेह्यांच्या परिचित गृहस्थांचा फोनो विकायचा आहे, चेष्टा नाहीं!' त्रिविक्रम गंभीरतेनें म्हणाला 'तुला घ्यायचा आहे ना फोनो? बघ, माल आणि मोल जुळलें, तर फोनोच्या मालकाला आणवूं...'

'अवश्य अवश्य...'

जयंतानें वेणूला आवडल्यास तो फोनोग्राफ खरेदी करण्याचा निश्चय केला. सावित्रीबाईच्याप्रमाणें ही चीज आहे कीं नाहीं हें वेणूनेंच ठरवायचें होतें. जयंताची सावित्रीबाईच्या यजमानाशीं औपचारिक संभाषण करण्याइतकीही अद्याप ओळख झाली नसल्यानें त्यांच्याकडचा फोनोग्राफ कसा आहे ह्याची त्यास कांहींच कल्पना नव्हती.

वेणूच्या मनांत ग्रामोफोन घेण्याचें मुळींच नव्हतें. परंतु आतां जयंतच आपला हेका सोडीना. त्याच्या आग्रहावरून वेणूनें फोनोग्राफ बघितला. त्याक्षणीं ती उद्‍गारली, 'अगबाई, थेट सावित्रीबाईच्यासारखा आहे हा फोनो...'

जयंताचें समाधान झालें. त्यानें ताबडतोब त्रिविक्रमास फोनोग्राफच्या मालकाला बोलावणें धाडण्याविषयीं सांगितलें.

अन् तो आडगिऱ्हाइकी फोनो ज्याचा होता तो मनुष्य पाहून जयंताच्या व वेणूच्या आश्चर्यास पारावार राहिला नाहीं.

सावित्रीबाईंचा नवराच होता तो.

वेणू एकदम बोलली, 'सावित्रीबाई तर काल मला म्हणाल्या कीं, फोनोग्राफ आम्ही आपल्या कोणा गरीब नातलगाला मोफत दिला त्याला अतिशय आवडला होता फोनो म्हणून ही देणगी....'

'उगीच बडेजाव मिरवायची संवयच आहे तिला,' अगोदरच वरमलेला सावित्रीबाईंचा नवरा म्हणाला. 'लहानपणापासून एका श्रीमंत बाईनें मुलगी समजून तिचें लालन पालन केलें, लग्न जमवलें, धनिकांची ऐटदार बोलणी शिकली आहे ती...'

'मोटारी उडवणाऱ्या इतकीच छानछोकी करण्याचा आपलाहि हक्क आहे...' त्रिविक्रम मध्येंच उद्‌गारला.

'तिच्याच छंदानें मी खर्चिक बनलों. तरी याच्या आधीं आमची मोठ्या भाड्याची जागा होती ती सोडली. फोनोग्राफ हप्त्यानें आणला आहे त्याचे पैसे फिटेनात. दुकानच्या मालकानें हप्ता न आल्यास पठाण पाठवीन असें धमकावलें. म्हटले, चार चौघांत शोभा नको. फोनोग्राफच विक्रीला काढावा मुकाट्यानें. इतःपर मी बायकोकडे जरासुद्धां लक्ष पुरवणार नाहीं. तिच्या नादानें ऐपतीबाहेर रक्कम उधळायचा नाहीं.'

जयंताला व वेणूला सावित्रीबाईंच्या पतिराजांच्या तोंडचा हा फोनोग्राफ अत्यंत उद्‌बोधक व श्रवणीय वाटला!

त्रिविक्रमच्या मनांत दारिद्र्य छपवल्याबद्दल फोनोग्राफच्या मालकांस छेडावें असें होतें.

पण तो पडला अनोळखी इसम! शिवाय फोनोग्राफचा सौदा पटला होता.

वेळसमय जाणून त्रिविक्रमनें त्वेषानें एवढेंच शब्द उच्चारले 'आपण मधल्या वर्गांतले पांढरपेशे बुद्धिजीवि मजूर फोनोग्राफसारखेच—आंत ओबडधोबड यंत्रें; परंतु वरून झकूपक्, अन् झारदार गोड सुरांची उगीचच आतषबाजी!...'

# उल्का नाहीं, तारका! : : : ४

दुधाच्या कळशीची शिंकाळी सायकलच्या पुढील दांड्याला अडकवून पहाटेचा जो निवृत्ति पुण्यांत जाई, तो सगळीकडे दूध वांटून सरासरी सकाळीं आठाच्या सुमाराला पाषाणला परतत असे.

आज सायकलच्या मागल्या चाकांतली हवा कमी कमी होत असल्याचा त्याला भास होत होता. पण तो नुसता भासच असावा असें निवृत्तिला वाटलें. सायकलची दुकानें निघून गेलीं तरी निवृत्ति थांबला नाहीं याचें कारण हेंच.

मध्यें वारक्या खडुयांचे चार दोन आंचके सायकलला बसलें. आंतली रबराची नळी सपशेल चिमटून खाड् खाड् आवाज व्हायला लागला. निवृत्तीनें ओळखलें कीं आपल्याला पायीं जाणें भाग पडणार !

तरी तो हट्टानें तसाच सीटवर बसून पाय मारीत राहिला. पाषाणपर्यंत अशी सायकल दामटत न्यायचे त्यानें ठरवलें होतें.

पण खालीं उतरायला एक निमित्त घडलें.

' बाबा, एवढं ओझं उतरूं लागतां का ? '

समोरून येणारी कुणब्याची तरुण मुलगी डोक्यावरची शेणाच्या गोवऱ्यांची पाटी उतरण्याबद्दल त्याला विनवीत होती.

' सायकल त्या खांबाला टेकवून आलोंच. '

रस्त्याच्या कडेला विजेच्या दिव्याचा खांब होता; तिकडे सायकल नेत निवृत्ति म्हणाला.

सोमा दमली होती. शेजारींच दगडी पुलाची लहानशीं भिंत होती. तेथें अजून ऊन आलेलें नव्हतें. त्याच पुलाच्या कठड्यावर तिनें निवृत्तीच्या साहाय्यानें गोवऱ्यांची पाटी ठेवली व तिच्या शेजारीं बसत सोमानें निवृत्तीला विचारलें. ' कुठं चाललात तुम्ही ? '

' पाषाणला...'

' बसा कीं ! घाई नाहीं ना जायची ? '

' घाई हो ? ' निवृत्ति बसून म्हणाला; ' होती, पण सायकलींतली हवा गेलेली; पायींच जावें लागेल आतां. '

' बिघडलीय् वाटतं ? '

' अंऽहं...सायकलच्या दुकानीं हवा भरायला कंटाळा केला. पंप नाहीं...कांहीं दिवस घेत नव्हतो बरोबर; पुन्हा जरूर नाहीं पडली; तो नाहींच घेत. वाटेंत गमती गमती होतात. परवा हा ब्रेक घट्ट झाला होता; करकर वाजत होता. जवळ तेलाची बुधली नव्हती. मी काय केलं असेन ? '

' मला नाहीं सांगतां येत ! '

' ऐका ' निवृत्तीनें कानांतला अत्तराचा बोळा काढला व म्हटलें ' हा फाया पाहिलांत ? हा पिळून मीं काम भागवलं. '

' अरे वा ! उद्यां वंगणाचं एरंडेल तेल वासाला घ्याल तुम्ही ! पंप न्याल ना आतां पुढं ? ' सोमानें हंसत विचारलें.

' केव्हांहि '

निवृत्तीला सोमाचा खेळकरपणा आवडून त्याला तिची चौकशी करण्याचा मोह झाला.

‘ तुम्ही कुठं निघालात—? ’ त्यानें प्रश्न टाकला.

‘ पुण्यांत गोवऱ्या विकायला. ’

‘ हाच धंदा का ? ’

‘ हो ’

‘ मी दूध विकतों. गवऱ्याही होतात; पण त्या घरीं लागतात सरपणाला. ’

‘ मीही दूध विकतें. फक्त एकाच ठिकाणीं. ’

‘ कुठं ? ’

‘ तो दूर दिसतो आहे ना ! ’ बोट दाखवीत सोमा म्हणाली, ‘ त्या हिरव्या बंगल्यांत; तिथं एक नटी राहते; स्वभावानें चांगली आहे; मला सिनेमांत येण्याचा आग्रह करते सारखी. ’

‘ जाणार का ? बाकी दिसतां तुम्ही छान. ’

‘ इश्य... ती नटी ज्या कंपनींत आहे, तो मालकही येतो कधीं कधीं तिच्याकडे. त्यानं देखील मला कित्तीवाऱ्या सांगितलं सिनेमांत यायला. ’

‘ उत्तम ! ’

‘ एरवीं नटी बरी आहे. दूध मात्र चोख पिळून घेते गड्याकडून. म्हैस न्यावी लागते तिच्या बंगल्यावर. ’

‘ भाव ? ’

‘ रुपयाला तीन शेर ’

‘ माझीं दोनतीन श्रीमंत गिऱ्हाइकं शहरांत आहेत. उजाडत चहाला दूध पाहिजे असतं त्यांना. कुठं राहतां तुम्हीं ? ’

‘ चतुःशृंगीच्या पायथ्याशीं झोंपड्या आहेत, तिथं सोमा गौळण विचारलं कीं कुणीही सांगेल. ’

‘ तिथनं शहरापर्यंत इतक्या गोवऱ्या नेणार ! केवढं हें गोवऱ्यांचं ओझं. ’

‘ हो ना ! जीव रकमेला येतो नेतां नेतां ! ’

‘ घेतं तरी कोण येवढ्या गोवऱ्या कां... ’

‘ थांबलातसे ? ’

‘ म्हटलं पुण्यांत देवीची साथ सुरू झालीय्; माणसं मरताहेत, तेव्हां गोवऱ्यांचा खप... ’ थट्टेखोर आवाजांत निवृत्ति बोलला.

‘ काय आहांत हो ! तसलं कांहीं नाहीं हं ! ’

उन्हे त्यांच्यापर्यंत येऊन पोंचल्यानें दोघांनींही आपापली वाट धरली.

—आणि नंतर रोज उभयतां रस्त्यानें भेटत, त्या वेळीं घटका घटका बोलत बसण्याचा कार्यक्रम त्यांना अगदीं पाठ झाला होता.

एक दिवस नेहमीपेक्षां जास्त वेळ बसण्याचा सोमा आग्रह धरूं लागली.

निवृत्तीनें विचारलें ‘ आज कांहीं विशेष आहे का, सोमा... ! ’

‘ अं ऽ अं ऽ ’ सोमा घुटमळली.

‘ तुझा चेहराच सांगतो आहे कीं ? ’

‘ तर तर ! माझ्या बापासारखं देवऋषीपण येतं तुम्हाला ! ’

‘ भले शाबास ! तुझा बाप भविष्य ओळखतो का ! माझ्या आजीचा फार विश्वास भविष्यावर...मंत्रतंत्रावर ! ’

‘ टाकतेंच बोलून मला काय बोलायचं तें. उद्यांपासून आपली भेट होणार नाहीं या वेळेला ! पहाटे कदाचित् होईल. ’

‘ कां असं ? ’

‘ मीं त्या हिरव्या बंगल्यांत राहाणाऱ्या नटीबरोबर जाणार आहें कंपनींत. गोवऱ्या विकणं सोडणार. दूध घालीन; पण फक्त त्या नटीला. ’

‘ नटी होणार तूं ? ’

‘ असं त्या हिरव्या बंगल्यांतली बाई म्हणते ! ’

‘ मी केव्हां केव्हां सिनेमाला जातों. कसं काय चित्र घेतात ? ’

‘ तुम्ही या ना ! कधीं याल ? ’

सोमानें तिला समजलेला स्टुडिओचा पत्ता सांगून टाकला.

‘ मला मरायलासुद्धां फुरसत नाहीं ! ’

‘ बस्—करा हं अभद्र बोलणं. ’

‘ खरंच ! घरी आजी एकटीच आहे. तिला होत नाहीं; मलाच सारं बघावं लागतं...पण सोमा...’

‘ अं ? ’

‘ नाहींच तिकडं गेलीस तर ? ’

‘ घरची गरिबी आहे; देवऋषीपणावर बापाला काय मिळणार ? परवां कातडयाच्या लालचीनं महारांनीं म्हशी जादूटोणा करून मारल्या असं बाप म्हणतो. म्हशी मरून नुकसान झालं हें खरं; तेवढाच आईबापांना हातभार होईल. ’

‘ ठीक, माझी ओळख विसरूं नको हं. ’ निवृत्तीनें तिजकडे प्रेमळपणं बघत म्हटले.

‘ असल्या ओळखी पुसून टाकता येतात का हो कधी ! ’ त्याच्या भरदार छातीकडे अन् पुष्ट बाहूंकडे आळीपाळीनें पाहात सोमा म्हणाली.

इतक्यांत कचऱ्याची गाडी त्या रस्त्यानें गेली. सर्वत्र दुर्गंध दरवळला.

झर्‌दिशीं कानांतला फाया काढून निवृत्तीनें विचारलें. ‘ अत्तर लावायचंय् ? ’

आपल्या हाताचा पालथा पंजा पुढें करीत सोमानें म्हटलें ‘ हं, लावा.’

अत्तरानें घमघमलेला कापसाचा बोळा तिच्या उजव्या हाताच्या तळव्याच्या मागल्या बाजूला चोळतांना उभयतांचा जो हस्तस्पर्श झाला, त्यासरशी एकमेकांच्या अंतःकरणांत मधुर भावना खेळूं लागल्या !

पुढें निवृत्तिला सोमा बरेच दिवस भेटली नाहीं. त्याला पहाटें तिची गांठ घेणें जमत नसे. कारण त्या वेळीं निवृत्तीला पुण्यांत जावें लागे. घरीं आल्यावर एकामागून एक कामाचा लकडा त्याच्यामागें असें. निवृत्तीची म्हातारी आजी फार थकली होती. तेव्हां वेळ पडल्यास स्वैपाकपाणीहि तो करी.

सिनेमानटीबद्दल निवृत्तीला कुतूहल होतें; पण एका माहितगार गिऱ्हाइकापाशीं त्याविषयीं बोलतांना तो म्हणाला,

‘ नटी—हाःहाः—निवृत्ति, तुझं या सिनेमाक्षेत्रांत कसं लक्ष गुंतलं ? आपल्या धंद्याकडे डोळेझांक करूं नको हं; नाहीं तर दुधांत पाणी घालशील; आम्हाला पाणीदार दूधवाला चालेल; पण पाणीदार दूध खपणार नाहीं; नटी कुलीन कीं अकुलीन ?—बाप रे ! हें कलायुग म्हणजे कलियुग आहे कलियुग ! ’

हें उद्‌गार ऐकून निवृत्ति चमकला ! आणखी एकदोघांनीं त्याला असेंच सांगितलें.

मग तो सोमाला भेटण्यासाठीं व तें वातावरणहि बघण्याकरतां म्हणून सोमानें सांगितलेल्या पत्त्यावर निघाला.

पहारा करणाऱ्या गुरखा शिपायानें निवृत्तीला हटकलें,

‘ कोण पाहिजे तुला ? ’

‘ सोमा ! ’

‘ सोमा ! सोमाबिमा नाहीं इथं कोणी ? ’

निराश मनानें निवृत्ति परतला. त्याचें लक्ष रस्त्यालगत उभ्या केलेल्या चित्रावर खिळलें.

निवृत्तीची मुद्रा पालटली.

त्या चित्रांत कुणी एक तरुणी तिच्या बरोबरीच्या तरुणाशी शृंगारिक चेष्टा करीत आहे असा देखावा होता.

खास ! त्या चित्रांत रंगवलेली तरुण स्त्री सोमाच होती ! !

झट्कन माघारी वळून निवृत्ति म्हणाला ‘ ह्या–ह्या–चित्रांतल्या बाई हव्यात मला ! ’

बोलत असतांना त्यानें चित्राकडे मान फिरवली.

‘ हः हः हः हः...मिस् शोभा...’

किती वेळ तरी तसाच हंसत राहून नंतर तो गुरखा पहारेकरी उपहासानें बोलला,

‘ नीघ गांवढळा ! म्हणे मिस् शोमेला भेटाय्‌चंय्...वशिल्यानें नोकरी वगैरे पाहिजे असली तर ही पाटी पाहा...वाचतां येत नसली तर मी मजकूर सांगतों...नोकरीकरतां जागा नाहीं...’

त्या गुरखा रखवालदाराच्या रगेलपणाला निवृत्तीनें एक सणसणीत गुद्दा लगावून तावडतोब उत्तर दिलें असतें. पण त्याचें मन ठिकाणावर नव्हतें.

विचारांत भ्रमण करीत असल्यानेंच दुसऱ्या दिवशीं पहाटे त्याची सायकल चुकून मोटरला धसटून लांब फेंकली गेली.

निवृत्तीला जबर मुका मार बसला. त्याचें काळीज दुखावलें.

दुधाची कळशी पालथी झालेली पाहून निवृत्तीला वाटलें कीं इतकें रक्त जरी सांडलें असतें तरी पर्वा नव्हती.

कारण आतां न्हाऱ्याच्या वेळेला शहरांत दूध कसें पोंचवणार !

मोटर भरधांव निघून गेली. चूक निवृत्तीची असल्यानें घडलेल्या अपघाताबद्दल कांहींही करतां येण्याजोगें नव्हतें.

पाषाण दूर राहिलें होतें. कुठें जावें हें निवृत्तीला कळेना.

भांबावलेल्या अवस्थेंत तो तसाच पुढें चालत राहिला. त्या सुमाराला सूर्य उगवायला अवघा पंधरा मिनिटें अवसर होता.

'पायींच निघालांत वाटतं ?'

आवाज ओळखीचा वाटल्यावरून निवृत्तीनें पाहिलें.

सोमा चालली होती. तिच्या डोक्यावर अंबोणाची पाटी होती. म्हैस हळूं हळूं तिजबरोबर जात होती.

'हं ऽऽ' निवृत्तीनें सुस्कारा सोडला.

'नुक्ती मोटर गेली ना ! ती आमच्या सिनेमा कंपनीच्या मालकांची.'

'त्या हिरव्या बंगल्यांत येतात ते ?'

'हो, अधून मधून येतात; नटीला फिरायला घेऊन गेले असतील गणेश खिंडीकडे.'

निवृत्ति संथपणाने चालत होता.

'झालंय् का कांहीं ?' सोमानें काळजीयुक्त स्वरानें विचारलें.

'सायकल नादुरुस्त आहे !'

'मला वाटतं तुम्ही अंमळ लंगडत चालतां आहांत; अहो तुम्हालाच चालतां येत नाहीं, तर धंदा कसा चालवणार दुधाचा ?'

'तुझ्या सिनेमातलं हे वाक्य दिसतंय्—' एवढेंच निवृत्ति रागारागानें म्हणाला.

आज कित्येक दिवसांनीं त्यांची गांठ पडत होती, तरीसुद्धां निवृत्ति आपुलकीच्या भावनेनें आपणाशीं बोलत नसल्याचें पाहून सोमा कष्टी झाली.

'पुण्यांत देवीची सांथ वाढती आहे ना ?' तिनें निवृत्तीला विचारलें.

'हं'

'मी टोंचून घेतलंय्; तुम्हीहि घ्या हं.'

'घेतलंय्'

'मी येत्या चित्रपटांत फारसं काम करणार नाहीं. पुढच्या चित्रपटाची

मात्र मी नायिका आहे. लौकर निघायचा आहे चित्रपट; माझं नांव त्यांनीं शोभा ठेवलं आहे. तुम्ही आलां नाहीं सिनेमा कंपनींत?'

जणूं काय आपण चित्रपटांत काम करतों हे निवृत्तीला पटत नाहीं याची अटकळ बांधूनच सोमानें बोलायला सुरवात केली. तिच्या सरबत्तीला निवृत्तीनें कदाचित् होय किंवा नाहीं अशा थाटाचेच उत्तर दिलें असतें, पण त्याच्या छातींत कळ आली—तो थांबला.

'काय होतंय?'

'मोटर लागली. दुधाची कळशी उपडी झाली...'

'त्या नटीच्या दुधाचं जमवीन मी कसंही...माझ्या म्हशीचं खुशाल घ्या ना दूध पिळून.'

निवृत्तीनें तसें केलें व तो म्हणाला 'सायकल दुरुस्तीला टाकतो न् टांग्यांतून घेऊन जातों दूध; तुझे पैसे आणून देईन!'

'तर तर! पण खरंच याल का संध्याकाळीं? निवान्तपणें गोष्टी बोलूं.'

निवृत्तीनें दुपारींच दहाची नोट सोमाच्या बापाच्या हातांत दिली; तसा तो सोमाच्या आईला म्हणाला, 'बघ बघ! अचानक लाभ! उगीच नाहीं फलज्योतिष पहात! सोमाकडून घेतलेल्या तीन शेर दुधाला हा खुषीनं दहा रुपये देतोय्.'

निवृत्तीची आपल्यावर गैरमर्जी कां आहे हें सोमानें जाणलें होतें. पण आतां इलाज नव्हता. सिनेमा कंपनींत ती करार करून चुकली होती. शिवाय मिळणाऱ्या पैशांत म्हशी मेल्यामुळें जो तोटा झाला, तोही भरुन निघणार होता.

दिवस फार नव्हते! अवघे दोन महिने! रात्रंदिवस शूटिंग चालणार होते!!

सोमा अलिकडे दूधसुद्धां विकीत नव्हती. पहाटे निवृत्ति भेटावा या-साठीं तिनें रस्त्यावर उभे राहायचा प्रयोग करून पाहिला; परंतु उपयोग झाला नाहीं.

चतु:शृंगींच्या जत्रेला निवृत्ति भेटेल असा तिचा कयास होता. ती वाट पाहत बसली असतां एका जख्खड म्हातारीनें तिच्या बापाला विचारलें—

'माझा नातू भलताच आजारी आहे; कधीं बरा होईल हो?'

शिवरात्रीला तीं पाषाणच्या महादेवाला आपल्या बापाबरोबर गेली, तेव्हां हीच म्हातारी भाविकपणें सोमाच्या बापाला आजारी नातवासंबंधीं प्रश्न करीत होती.

—भविष्य सांगणाऱ्या बापाला आपलें भाग्य विचारावें असें सोमाला क्षणभर वाटलें. बापाचें शंभरांतलें नव्याण्णव ठोकताळें हुकतात हें जर आगाऊ ठाऊक नसतें, तर तिनें आपला हात खात्रीनें बापाला दाखवला असता.

—देवळाजवळ न थांबतां सोमा पाषाण गांवांत निवृत्तीचें घर शोधूं लागली.

गांवांतून तो बाहेर राहायला गेल्याचें तिला समजलें.

§ § § §

विशेषसा अनुभव नसतानादेखील सोमाला नटीच्या आयुष्याचा कंटाळा आला. चाकरी टिकवण्यास लागणारा लाळघोटेपणा तिच्या स्वभावांतच नव्हता. ती खरीखुरी तारका होती. ऐषआरामाच्या आशेनें उल्का होऊन अनीतीच्या रौरवांत कोसळण्याइतक्या ठिसूळ मनोवृत्तीची ती नव्हती. अशिक्षित असली तरी सोमा बाणेदार होती. मालकाच्या नजरेंतलें वीष आपल्या शरीरांत न भिनेल अशी तिनें खबरदारी राखली.

तरी पण सोमाला तिथला अपवित्रपणा टाळणें जड जाऊं लागलें. केव्हां एकदां करारांतून मुक्त होतें असें तिला होऊन गेलें.

रोज पक्कान्नें खाणाऱ्या श्रीमंताला ज्याप्रमाणें भाजी–भाकरीचें महत्त्व अतोनात वाटतें तसें सोमाचें झालें.

—सगळे सोडून साधा पेशा पत्करायचा; पुन्हा निवृत्तीला पुण्याहून सायकलवरून येतांना थांबवायचे, त्याच्याशीं मनमुराद गप्पा मारायच्या असें तिनें ठरविलें.

कंपनीच्या मालकांनीं जंग जंग पछाडलें तरी न जुमानता तिनें नोकरी सोडली. ह्या तिच्या करण्याचा हिरव्या बंगल्यांतल्या नटीला आनंदच झाला. कारण सोमानें अल्पावधींत तिचे प्रस्थ खूपसें कमी केलें होतें.

❀ ❀ ❀ ❀

पहिल्याच दिवशीं सोमा गवऱ्यांची पाटी डोक्यावर घेऊन पुण्याकडे निघाली.

तोंच मागून एका म्हातारीनें तिला गांठलें. सोमाच्या बापाला भविष्य विचारणारी हीच ती म्हातारी !!

'बाई,—गोवऱ्या देतेस उधार ?' म्हातारी रडतच विचारत होती.

'कोण तूं ?'

'सोमा ना तुझं नांव ? मी निवृत्तीची आजी !'

'असं ? कुठं आहेत ते ?'

म्हातारीनें डोळ्याला पदर लावला, 'मोटरची टक्कर लागून त्याचं काळीज दुखावलं, दावखान्यांत सांगितलं सायकलवर बसूं नकोस. टांग्यांतून दूध पोंचवीत होता.'

'मग ?'

'पुण्यांत देवीची सांथ आहे. पाषाणच्या गुरांना देवी आल्या, असं कुणीसं उठवलं. सारे रतीब भडाभड सुटले. दुधाचा धंदा बसला—निवृत्तीचे दुखणं विकोपाला गेलं.'

'चला चला; मी येतें; जाऊं आपण त्यांच्याकडे.'

'कुठं येतेस; एक दिवस रात्रीं पायींच पुण्यांत सिनेमाला गेला—नू तेव्हांपासून जो आला तो बेमार. हवापालट केली, शेजारीं एकाच्या मळ्यावर राहायला गेलों....'

हुंदके आवरीत म्हातारी पुढें म्हणाली, 'निवृत्ति बरळत होता,'आजी, तुझ्यापाशीं पैसा नाहीं. चतुःश्रृंगीच्या रस्त्यावर सकाळीं आठला सोमा भेटेल तिच्यापासून उधार गौऱ्या घेऊन मला जाळशील तर मला चांगली गति मिळेल' असं बडबडतांना पोरानं अंग टाकलं ग !—माझ्या शकुनावर भरंवसा—बोलण्याचा पडताळा पाहायला आले धापा टाकीत....'

कळलेली बातमी सोमाचं हृदय चरचर कापीत गेली. विजेच्या लोळ अंगावर आल्यानंतर ज्या यातना होतील, त्या तिनें तेवढ्या पळभरांत सोसल्या. तिच्या डोक्यावरची गोवऱ्यांचीं टोपली लवंडली. साऱ्या रस्त्याभर गोवऱ्या झाल्या.

'हाय रे देवा, निवृत्ति....'

सोमाच्या शोकातिरेकानें दाटलेल्या गळ्यांतून जास्त शब्द उमटेनांत.

असहायतेनें ती म्हातारीच्या आसऱ्याला धांवली.

दोघीही रडूं लागल्या ढसढसां!!!

# कामधंदा पाहायसाठीं— : : ५

इंग्रजी सहावीमध्यें तिसऱ्या वेळीं जेव्हां अपयश आलें तेव्हां शिक्षणपेशा सोडून नोकरपेशा स्वीकारण्याबद्दल तीर्थरूपांनीं मला सल्ला दिला.

मलाहीं तो व्यवहार्य वाटून मी नोकरी शोधूं लागलों. अर्थात् बंडूसुद्धां माझा सांथीदार होताच. त्याचे व माझे समानशील असल्यामुळें मैत्री छान जमली होती.

आम्हा दोघांचा कल लहानपणापासून सिनेमाच्या धंद्याकडे विशेष होता. हल्लीं हिंदी नटांत जीं वैगुण्यें आहेत, तीं दूर करण्यांत आपल्यां आयुष्याचा व्यय करायचें आम्ही ठरवलें. बंडू म्हणे, 'एकाद्या नटीशीं लग्न केलें कीं आपणाला अनायासें नटीचा नवरा म्हणून लोक नट म्हणतील; अशानें कलावंतांत आपली गणना होईल. शिवाय पतिप्रेमामुळें बायको आपणास

कांहींसुद्धां चाकरीं पत्करूं देणार नाहीं व अशा रीतीनें 'ष्टार' ची कांस धरली कीं आपल्याला ध्येयाची ध्रुवतारका गांठणे अधिक सुलभ होईल.'

कोणत्याही गोष्टींत प्रथम चंचुप्रवेश करून घेतला पाहिजे. या दृष्टीनें आम्ही कांहीं फिल्मकंपन्यांना अर्ज केलें. फक्त आरसे धरणाऱ्यांच्या जागा रिकाम्या असल्याचें उत्तर आलें. माझा जाण्याचा विचार होता. पण बंडू म्हणाला 'अरे, आपण आरसे धरण्याचें काम चांगलें केलें तर बढती मिळेल ही तुझीं समजूत चुकीची आहे. यांना हेंच काम चांगले येतें, हेंच करूं द्या, असें हे मालक लोक नक्की म्हणायचें!'

आम्ही दोघांनीहि शहरची हवा अजून चाखली नव्हती. नुसते अर्ज करणें आमच्या हातांत होतें. पुढें बंडूनें आणि मी एक युक्ती काढली.

बंडू एकदां म्हणाला, 'सिनेमा नट नटींना सात सात आठ आठ हजार रुपये पगार असतात......'

'मग त्यांनीं एकाद्या महिन्याचा पगार जर इकडे लावून दिला तर आपले जन्माचें कोटकल्याण होईल कीं रे!' मी म्हटलें.

आम्ही दोघांनीं बहुतेक मोठ्या पगाराच्या देशी व परदेशी नटींना आमच्या घरच्या दुःस्थितीची कादंबरीमय वर्णनें लिहून पत्रें धाडलीं, व निदान एक महिन्याचा तरी पगार पाठविण्याची नम्र विनंती केली. एक आठवडा लोटला तरी एकादेखील पत्राचें उत्तर नाहीं. तेव्हां बंडू व मी अत्यंत निराश झालों. 'या धंद्यांत पडल्यानें हृदयाचें फत्तर होतात. नकोच हा धंदा आपल्याला' असें बंडू म्हणाला व मीहि त्याच्या विचारास संमति दर्शवली.

रोज आमचा बेकारीबद्दल यथास्थित उहापोह होई.

एक दिवस आम्ही आमच्या गांवाबाहेर फिरण्यास गेलों असतां मी म्हटलें 'बंडू, मला काल एक स्वप्न पडलें.'

'हो शंभू! कसलें?' बंडूनें विचारले.

'स्वप्नांत, सकाळीं सहाची वेळ होती. तूं ऑफिसमध्यें टेबलाजवळील एका खुर्चीवर पाय ताणून बसला होतास....'

'शंभू! हे पहाटेचें स्वप्न ना...'

मी हुंकार देतांच बंडू म्हणाला, 'अरे पहाटेचीं स्वप्नें नक्की खरी व्हायची.

कालच मी एक ' वॉन्टेड'ची जाहिरात मोफत वाचनालयातील ' टाइम्स ' मध्यें वाचली. पुण्याच्या अप्पा बळवंत चौकांत ' यल्लाप्पा ॲण्ड सन्स् ' यांचेकडे एक बडी नोकरी आहे. समक्ष भेटण्यास सांगितलें आहे त्यांनीं. मी जाणार आहे लौकरच. म्हटलं पुण्यासारखं शहरहि पाहाण्यास मिळेल. बाकी आपण यापुढें पुण्यातच राहणार. या भिकार रांजणवाडींत कोण दिवस काढतो. बरें, चालूं दे स्वप्नाची हकिगत !...'

बंडू अगदीं रंगांत येऊन बोलत होता.

' तुला सकाळीं लौकर उठावें लागल्यामुळें तुझ्या डोळ्यावरची झोंप उडाली नव्हती, इतक्यांत, कायरे बंड्या अजून हापीस झाडलें नाहींस का नऊ वाजले तरी ! ! आणि माझ्या टेबलावर खुश्शाल पाय पसरून निजलास ? कांहीं लाज ? कां लाथ मारून चाकरीवरून हांकलून देऊं ? तेव्हां तूं–'

' शंभ्या, गाढवा बराच दिसतोस कीं, ' बंडू एकदम रागावून म्हणाला.

त्यानंतर उत्तरें प्रत्युत्तरें खूपच झाली. नि आम्ही घुश्यांतच आपापल्या घरीं गेलो. तरी पण बंडूनें सांगितलेली नवीन बातमी मी विसरलों नव्हतों. घरीं गेल्यावर मी ती आई वडिलांना सांगितली.

वडिलांनीं दुसऱ्याच दिवशीं मला जाण्यास फर्मावलें. त्याच दिवशीं आईनें चिवडा दशम्या तांब्याभांडें व धोतरपंचा बांधून माझें गांठोडें तयार केलें.

आमच्या रांजणवाडीहून रेल्वेची सोय असल्यामुळें मी आगगाडींतून दुसऱ्या दिवशीं पहांटेच पुण्याला निघालों. स्टेशनवर वडील व आई मला पोंचवण्यास आलीं होतीं.

वडिलांनी जातांना मला ' पुण्याचें वर्णन ' हें पुस्तक दिलें आणि माझें ओझें विशेष नसल्यामुळें टांग्याचा खर्च न करतां काम संपवून ये असें त्यांनीं सांगितलें. आईनेंहि, ' पुण्याला प्रथमच जातो आहेस, जवळ पैसे आहेत, जपून अस, ' म्हणून पुनः पुन्हा बजावलें.

गाडी चालूं झाल्यावर मी आसपास नजर टाकली. माझ्या शेजारीं एक म्हातारा बसला होता. थोडया वेळानें एकदम ' अरे, हाताला हे तांबडें

कसलें ! रक्त बिक्त आलें काय, ' असें म्हणत त्यानें उजवा हात हातांत घेतला, व ' मस्तक रेषा ' ' धन रेषा ' असे कांहींसें पुटपुटत तो म्हणाला, ' तुमच्या हाताच्या बोटावर चार शंख आणि एक चक्र आहे. पुढें तुमचा राजयोग असून तुम्हास संपत्ति विपुल लाभणार यांत शंका नाहीं. '

' कशावरून म्हणतां तुम्ही ' मी हर्षनिर्भर होऊन पृच्छा केली.

'तुमचा हातच तसा आहे.' तो माझा हात सोडीत म्हणाला.

पण जरा वेळानें मला त्याचा गनिमी कावा कळला. तो बोलला ' तुम्ही भविष्यकाळांत इतके श्रीमंत होणार. मग आतांच आम्हाला द्या कीं कांहीं तरी ' मी जेव्हां कांहींच बोललों नाहीं, तेव्हां ' भविष्य पाहिलें ते पाहिलें अन् पैसे द्यायला नकोत. ' म्हणून तो चारचौघांसमक्ष माझी नाचक्की करूं लागला. इत:पर तिथें बसणें हा वेडेपणा मानून मी दुसरी-कडे जाऊन बसलों.

तिथें शेजारच्या माणसाची माझ्याशीं बोलायची इच्छा दिसली, पण मघाच्या अनुभवामुळें मी शेजाऱ्यास उत्तेजन न देण्याचें ठरवलें.

'काय करावें बुवा, काळच वाईट आला आहे. ' तो मला ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानें म्हणाला.

मी गप्पच राहिलों.

नंतर माझ्याकडे वळून तो बोलला, 'हल्लींच्या काळाला तुमच्या-सारख्या होतकरू तरुणाची फार आवश्यकता आहे. तुम्ही नेहमी धीट, धडाडीनें युक्त असलें पाहिजे. तुमच्यासारखे लोक जर पुढें आलें तर माझी त्यांना सक्रीय सहानुभूतिसुद्धां आहे. पण छे:, तें नव्हेच !'

कांहीं नोकरीचा लग्गा लागला तर बघावा या हेतूनें मी म्हटलें, 'तरु-णांना सध्यां बेकारीमुळें जीव नकोसा वाटतो. द्रव्य मिळत नसल्यानें स्फोटक द्रव्याच्या आश्रयानें जगापार व्हावें असें त्यांच्या हजारदां मनांत येतें. त्यांना जर नोकऱ्या मिळाल्या तर...'

'चुकतां तुम्ही ! व्यापार, कारखाने, छापखाने, मुख्य म्हणजे छापखाने यांत शिरलें पाहिजे. तुमच्यासारख्यांनीं यांत पुढारी झालें पाहिजे. महा-राष्ट्राला हल्लीं सर्व दर्जाच्या लोकांची भूक भागवील अशा वर्तमानपत्राची गरज आहे. त्याकरतां एक नमुनेदार छापखाना निघायला हवा. स्वत:च्या

छापखान्याशिवाय वर्तमानपत्रास स्थैर्य नाहीं. मी व माझा मुलगा याला हवी तितकी मदत करूं. पण तरुणांत धैर्य नाहीं, उत्साह नाहीं—'

यांच्या योजनेला आपण मदत केली तर आपल्या पोटापाण्याचा प्रश्न कायमचा सुटेल अशी बलवत्तर आशा माझ्या हृदयांत जागृत झाली. मी म्हणालो 'मी तुम्हांस हवी ती मदत करीन. तुमचें ध्येय खरोखरीच मला फार आवडलें.'

'तुमच्या आईबापांची, तुमचे भले करणाऱ्यांची या कार्याला सहानुभूति असेलच.'

'मी जातीनें येतों म्हटल्यावर त्यांची काय गरज! खरेंच आपलें नांव मला समजेल का?'

'माझें नांव महादू आणि आडनांव शेले. इंग्लंडमध्यें जो शेले कवी होऊन गेला त्याचेच आम्ही दूरचे नातेवाईक. शेल्यांचे एक घराणें हिंदुस्थानांत रहायला आले, आणखी इथेच स्थाईक झालें—'

मला त्या गृहस्थाबद्दल अधिकच आदर वाटला. मी म्हटलें 'मग प्रत्यक्ष कार्यास कधीं हात घालतां?'

'आपलें काय! आतांसुद्धां घालूं. मला सटवाईची भाषा कळते. तिनें तुमच्या कपाळावर स्पष्ट लिहिलें आहे कीं तुम्हीं छापखाना काढणार.'

'हो, पण प्रारंभी तुमची मदत हवी. पैशाच्या दृष्टीनें...'

'तोच तर मुख्य मुद्दा आहे. जो कोणी छापखाना काढील त्याला माझी भरपूर मदत आहे. मी स्वतः अनेक छापखान्यांत जुळारी म्हणजे कंपॉझिटर होतों. हल्लीं माझी नोकरी सुटली आहे. तेव्हां मी तुम्हांस हवें तितकें साहाय्य करण्यास मोकळाच आहे.'

'आर्थिक दृष्टीनें मदत...'

'कबूल, तीहि मी दिली असती; पण आमचा वडिलार्जित जमीनजुमला इंग्लंडांत आहे. तेथें जायचे म्हणजे चारशें रुपये तरी लागतील. तेवढे देत असाल तर मी जमिनीची समक्ष विल्हेवाट लावून तुम्हांस आर्थिक मदत करीन, नाहीं तर तुमचे मळे वगैरे असतीलच. ते विकून तुम्ही सध्यापुरता खर्च करा. मागे नोकरी केलेल्या अनेक छापखान्यांतील

खिळे मजजवळ आहेत ते विकत घ्या. मी कंपॉझिटर म्हणून राहतों. माझा मुलगा वर्तमानपत्रें जिवापाड श्रम करून खपवील.'

मला ही योजना सांपत्तिक बाजूनें गैरसोयीची वाटली म्हणून मी स्तब्धच बसलो.

'अहो, गप्प कां ! कार्याला लागा. निदान आपले ध्येय निश्चित झाल्यावर त्यासंबंधींचें वाङ्मय तरी वाचून काढूं. तेवढ्यासाठीं तुमच्या हातांतील आंगठी...' असें म्हणून त्यानें एकदम माझ्या अंगठीवर झडप घातली.

मला सर्व लबाडी कळून आल्यामुळें मी त्यास आगगाडीची सांखळी ओढण्याची धमकी दिली, व कोणा व्यक्तीजवळ बसण्यांत अर्थ नसून निव्वळ अनर्थ आहे, असें समजून मी एकटाच एका स्वतंत्र बाकावर जाऊन बसलों.

सकाळीं दहा वाजतां गाडी पुण्यास आली.

मी पुणें स्टेशनावर उतरल्यानंतर जरा एका बाजूस गांठोडें खालीं ठेऊन उभा राहिलों, व 'पुणें शहराचें वर्णन' वाचण्यास काढलें. थोड्या दिवसांतच काम उरकून परतण्याचा बेत असल्याकारणानें, व टांग्यास पैसे घालवावयाचे नव्हते म्हणून, मी लगेच अप्पा बळवंत चौक कुठें आहे तें पुस्तकांत शोधूं लागलों.

इतक्यांत माझ्या पुस्तकावर झडप घालून तें ताब्यांत घेत कोणी तरी व्यक्ति उद्‌गारली, 'जय गोपाळ !'

'जय गोपाळ ?' समोरील इसमाकडे बघत मी रागांतच प्रश्न केला.

'जय गोपाळ. मी असतांना हें कशाला वाचतां ? ह्याची काय जरूर ? मी कोणी परका का आहे ? काय रे आईला जाऊन किती दिवस झाले ?'

माझी आई जिवंत असतांना तिजबद्दल अशी चौकशी ! !

'अहो, माझी आई हयांत आहे' मी क्रोधभरानें बोललों.

'तें मला माहीत आहे. पण ती तुला स्टेशनवर पोंचवायला आलीच असेल ना ! तिला जाऊन किती दिवस झाले असें मी विचारलें.'

या स्पष्टीकरणानें मला बरें वाटलें. पुण्यांत कोणी तरी आपल्या ओळखीचा भेटला हें एकपरी ठीक झालें.

'तुमचा व आईचा काय परिचय ?' मी विचारलें.

'हात्तिच्या ! सुमनचा ना ! ती तर माझी बहीण !'

'तिचें सासरचें आणि माहेरचेंहि नांव सुमन नाहीं.'

'हें मला ठाऊक आहे. पण माझें तें लाडकें नांव आहे, मागें आमचीं बहीणभावंडांचीं नांवें प्रसिद्ध झालीं होतीं वर्तमानपत्रांत !'

'खरं कीं काय ! एकूण माझ्या मातोश्रीचें नांव वर्तमानपत्रांत झळकलें तर !' मी अभिमानपूर्वक म्हटलें. 'कशाबद्दल ! समाजसेवा...'

'छेः छेः—एकदां आम्ही दोघेंहि भर गर्दीच्या रस्त्यांतून जात असतां टांग्याखालीं सांपडलों. तेव्हां वर्तमानपत्रांत हकीगत प्रसिद्ध झाली. त्यांत आमचीहि नांवें आली होती.'

'बरें तुमचें नांव ?'

'माझें पाळण्यातलें नांव राम. टोपण-नांव रावण.'

'आईनें तुमचा उल्लेख कधींच केलेला मला आठवत नाहीं.'

'नंतर त्याला कारणेंच तशी घडलीं. तुला मी लहानपणी पाहिला आहे. मी दहा रुपयाशिवाय तिला केव्हां भाऊबीजेची ओवाळणी घातली नाही. पण त्यावेळीं नुसता खणच मला परिस्थितीमुळें द्यावा लागला. तेव्हांपासून तिनें माझें नांव टाकले, काय सांगू तुला नंदी !' रावण डोळे पुशीत म्हणाला.

'नंदी नव्हे. शंभू म्हणतात मला. बरें पण काय हो ! तुमचे रावण असें टोपणनांव कां पडलें ?' मामांचे विषय-निवारणानें दुःख कमी होईल म्हणून मी विचारलें.

'आमच्या घरांत पूर्वी माझ्याशिवाय दहा माणसें होतीं. त्यांचें खाणें व माझे एकटयाचे खाणें बरोबर असे. यासाठीं मला दहातोंडया रावण म्हणत,' खाण्याच्या आठवणीमुळें कीं काय, रावणमामांचा चेहरा तरतरीत झाला.

त्यांनीं लगेच जवळच्या बाकांवर मला बसवून नजीकच्या हॉटेलमधून चहाचे दोन कप व पाव मागवले.

'घे शंभू,' रावणमामा मला चहा व एक पाव देत म्हणाले.

त्यांच्या लबालबा पाव खाण्याच्या आणि जलद संपवण्याच्या क्रियेवरून

त्यांचें रावण ह्या नांवाचें स्पष्टीकरण मला पटलें. मामांच्यावरील माझा विश्वास दुणावला. माझा चहाचा एक कप होईपर्यंत त्यांनी चहाचे चार कप व चार पाव फस्त केले.

आमचे खाणें संपल्यावर रावणमामा खिसे चांचपीत बोलले, 'शंभू, पैशाचे पाकीट मघां फळाटाबाहेर उभा होतों तिथें पडलं वाटतें. थांब वर! पाहून येतों.'

मी व हॉटेलच्या पोऱ्यानें सुमारें पंधरा मिनिटें रावणमामांची वाट बघितली. नंतर मी हॉटेलचें बिल चुकतें केलें व माझें गांठोडें घेऊन बाहेर आलों. त्यावेळीं रावणमामा वर पहात होते ते तावडतोब घरणीला नजर खिळवीत आणि आसपास बारकाईनें पहात म्हणाले, 'हल्लीं प्रामाणिकपणाचा इतका लोप कसा झाला! शंभू, तुझ्याकडे यायच्या आधींच थोडा वेळ मी इथें उभा होतों, तोंपर्यंत पैशाचें पाकीट असलेलें मला नक्कीं आठवतें. माझा खिसा कुणीतरी कापून, पाकीट पळवल्यावर तो शिवल्यासारखा दिसतो. तुला बिचाऱ्याला माझ्याकरतां भुर्दंड—!

'मामा, चला माझ्यावरोबर. मला आज एका ठिकाणीं जॉब पाह्यचा आहे. तेवढ्यासाठीं तर मी आलों. माझा उद्योग झाला कीं लगेच मी आईबापांना खुशखबर कळवायला माघारी निघणार. हें गाठोडें सुट-सुटितच आहे–हें पाठुंगळी घेऊन मी चालतों. तुम्ही मला अप्पा बळवंत चौक दाखवा म्हणजे झालें.'

'शंभू, माझें घर असताना मी तुला गांठोडें बरोबर नेऊं देईन? चल...अगोदर घरीं चल. मग तुला पुण्यांतले सारे चौक हिंडवतों. तुझें काम झाल्यावर दोघे जेवूं. आल्यासारखा संध्याकाळीं सिनेमा पाहूं. आणि मग जा. तुला तसाच पाठवला तर सुमन काय म्हणेल? आधींच ती माझ्यावर संतापली आहे.'

'बरं आहे चला.'

मी मामांच्या घरीं गेलों. ते एकटेच घरांत दिसले. लहानशीच खोली असून सामानही बेताचेंच होतें. मामांचा कांहीं वशिला लागला तर पहावा म्हणून मी त्यांना विचारलें, 'मामा, तुम्ही काय करतां?'

'मी! अरे मी काय करतों हें लौकरच तुला दिसेल. मला नोकरी

वगैरे कांहीं नसली तरी अवान्तर मिळकत रगड होते. एवढेंच तूर्त ध्यानात ठेव.'

'म्हणजे ! पुष्कळ उद्योग करतां वाटतें ?'

'समजेल, येईल लक्षांत, कळेल, येईल माथ्यांत...ध्यानांत येईल, अवगत होईल,' रावणमामांनीं हंसतमुद्रा धारण करीत म्हटलें. 'हं, आटप ! चल आधीं आप्पा बळवंत चौकाकडे. मधें माझेंहि काम आहे थोडेसें.'

आम्ही जात असतां रावणमामा म्हणाले, 'मला फार निकड आहे. मी तुला टांगाच करून देतों. तो तुला नेऊन सोडील अप्पाबळवंत चौकांत.'

रावण मामांनीं आणलेल्या टांग्यांत मी बसलो. टांगेवाल्यानें मला एका चौकांत आणून सोडलें. मी उतरून जाऊं लागलों, तोंच टांगेवाल्यानें मला हटकलें,—'साहेब पैसे ?'

'रावण मामांनीं दिले ना ?'

'कोण रावणमामा ! मुकाट्यानें एक रुपया टाका !' तो वदंळीला येऊन बोलला.

मी नवखाच असल्यामुळें त्याच्या दरडावणीला घाबरून एक रुपया त्याच्या स्वाधीन केला.

मला रावणमामा कोणी लफंगाच असला पाहिजे असें आतां वाटूं लागलें. व गाठोड्यांत कांहीं विशेष नसल्यानें आणि पैशाचा गल्ला खिशांत सुरक्षित असल्याकारणानें मी स्वतला धन्य समजूं लागलों. मात्र ज्या चौकांत मी उतरलों होतों तो अप्पा बळवंत चौक आहे किंवा काय याविषयीं माझें मन साशंक झालें.

'अप्पा बळवंत चौक हाच का ?' एका जवळच असलेल्या इसमास मी अदबीनें विचारलें.

त्यानें माझा चेहरा नीट न्याहाळून म्हटलें. 'छे हो, अप्पा बळवंत चौक खूप लांब आहे.'

'कसकसें जायचें ?'

'हें पहा, इथून थेट जा, मग डाव्या हाताला वळा, मग उजव्या हाताला मुरडा, पुन्हा डाव्या हाताकडे झुका म्हणजे पुणे स्टेशनवर आल-

नंतर भांबुर्ड्याचें तिकीट काढा. त्या स्टेशनवरून या शनवारवाड्यांकडे सरळ. तिथे अप्पा बळवंत चौकाचा रस्ता विचारा. तुम्हांला कोणीही सांगेल.'

मी 'कृपाकरून सावकाश सावकाश सांगा.' असें त्या सद्गृहस्थास विनवलें. त्याचें भाषण टिपून घेतलें आणि त्यानें दाखवलेल्या दिशेकडे निघालों.

आणखी कोणाचे तरी मिळालेल्या ताज्या सल्ल्यावर मत घ्यावें असें वाटून एकास विचारलें तशी तो म्हणाला, 'अहो, हाच अप्पा बळवंत चौक.'

'मग हें काय?' मी मघां टिपून घेतलेलें भाषण दाखवीत म्हणालों.

'हाही रस्ता आहे. पण हा लांबचा व दगदगीचा आहे. तुम्हांला वेळ न् पैसे वाचवायचें असतील तर माझें ऐका. कोणाकडे जायचं आहे तुम्हांला?'

मी म्हटलें 'यल्लाप्पा ॲण्ड सन्स.'

'हात्तुझी, या इकडे असे माझ्या मागनं' एक दोन वळणें घेऊन त्यानें मला एका पिवळ्या वाड्याजवळ नेलें व तो म्हणाला 'हं शिरा आंत. थेट आंत जाईपर्यंत कोणास विचारूं नका. तेथील मनुष्य तुम्हां-लाच येण्याचे कारण विचारील.'

मी त्या गृहस्थाचे आभार मानून आंत गेलों. जागोजाग पोलीस पहारा पाहून मला इपिसचे महत्त्वाचे काम असेल असेंच वाटलें. थेट तिसऱ्या मजल्यापर्यंत पोंचल्यावर मी बऱ्याच वेळानें यल्लाप्पाविषयीं चव-कशी केली. तेव्हां पोलीस शिपाई ओरडून म्हणाला, 'कोण यल्लापा, इथें कोणी नाहीं. हा फरासखाना आहे. कांहीं खटला आहे का?'

मला बाहेर सोडीनात. शेवटीं कामासाठींच आलों असें सांगून मी रावणमामाविरुद्ध तक्रार गुदरली व बाहेर सटकलों.

पुनश्च चौकांत प्राप्त झालों व बिल्डिंग्जचे मजले निरखायला सुरवात केली. अचानकपणें एका इमारतीच्या दुसऱ्या मजल्यावर मला हवी ती पाटी टांगलेली दिसली.

मी वर गेलों. माझी चेहरेपट्टी किंचित् तजेलदार झाली—

ऑफीस म्हणून जें होतें ती छोटीशी खोली असून तींत एक टेबल

व एक खुर्ची इतकेंच फर्निचर होतें. एक माणूस कांहीं तरी लिहिण्यांत गढला होता.

'यल्लाप्पा आपणच का?'

'हो, काय काम आहे?' लिहित असलेल्या व्यक्तीनें डोके वर उचलीत विचारलें.

'आपली 'वॉन्टेड'ची जाहिरात टाइम्समध्यें वाचली--'

'ओ हो हो हो--उभे कां! बसा कीं!' आपली खुर्ची मला देत व स्वतः मजकडे उत्सुकतेची दृष्टी रोखीत तो मनुष्य बोलला.

'मग आपण जागा देता ना?'

'हें पहा. माझा मासिकांत कोडीं देऊन लोकांच्या बुद्धीला चालना देण्याचा धंदा आहे. पुढें पैसे सांठले म्हणजे गोरगरिबांच्या करतां एक स्कीम आंखून...'

'पण पगार किती देणार?'

'छट्! ऑनररी म्हणून काम करण्यास आम्हाला उमेदीचा तरुण हवा. तुमच्याप्रमाणें जनतेच्या हिताच्या अनेक योजना घोळत आहेत माझ्या डोक्यांत. त्यांतून पगार पाहिजे असेल तर दहा हजार रुपये डिपॉझिट ठेवा. वर्षभर काम पाहून काय तें ठरवूं.'

मी निराशेनें तडक उठलों.

मी दाराबाहेर पडेपर्यंत यल्लाप्पाच्या डिपॉझिटची रक्कम उतरत उतरत शंभर रुपयापर्यंत आली होती, परंतु मी थांबलों नाहीं.

टांगा करून मी पुणें स्टेशन गांठलें व त्याला अखेरचा रामराम ठोकला.

रांजणवाडींत पाऊल ठेवल्यावर बंडूची गांठ घेण्याच्या तीव्र उत्कंठेनें त्याजकडे जातांक्षणीं बंडूची आई बोलली 'बंडू आतांच पुण्यास गेला. काय काम आहे हरी जाणे!'

*

*

# केवडा अन् कोरफड : : : ६

चालतां चालतां भिकारणीला थकवा आला. ती सावलीला बसली.

तिला भिक्षा फारशी मिळाली नव्हती. शिळेपाके, जळके तुकडे तिच्या पदरांत असायचे तेहि यावेळीं नव्हते.

तीनचार पसे तांदूळ काय ते तिजजवळ होते.

तिनें आपली दमली भागली नजर सभोंवार फिरवली.

तिला चट्कन कांहीं कल्पना आली. हातातले टमरेल घेऊन ती शेजारी घोड्यांचा पाणी पिण्याचा हौद होता तिथें गेली.

चौकांत होळीचीं लांकडें पेटत होतीं. शिमगा सरून आजचा तिसरा दिवस. अजून लांकडाचे ओंडे जळत होते.

भिकारणीनें पाण्यानें भरलेलें टमरेल विस्तवावर ठेवलें. पाणी कढत

होईपर्यंत तिनें पदरांत बांधलेल्या तांदुळांतील पोरकिडे व खडे बाजूला काढले.

भात तयार झाला. एरवीं तोंडी लावण्यासाठीं बटाट्याची भाजी घ्यायला चार दोन पैसे गाठीला असते, तर तसें तिनें केलें असतें.

परंतु आज तिजपाशीं तांब्याची शिवराईदेखील नव्हती.

भाताचे घांस तोंडांत अडखळूं लागले.

ती विटलेल्या तोंडानें आजूबाजूला पाहूं लागली.

कोंपऱ्यावर एक मुलींच्या शाळेची बाग होती. तेथल्या कुंपणांत चवळीच्या शेंगा उगवलेल्या तिला दिसल्या.

भिकारीण धांवतच गेली. बागेचें फाटक बंद होतें. पण मधलें तारांचें कुंपण कुणी तरी लांकडी खांब निखळून अस्ताव्यस्त केलेलें होतें. भिकारणीला सहज बागेंत शिरतां आलें.

ती चवळीच्या शेंगा तोडणार तोंच माळी तिथें आला.

तिनें माळ्याला बघितलें नव्हतें.

माळ्यानेंच तिला झर्दिशीं मागें ओढलें, तेव्हां ती तरुण भिकारीण दचकून ओरडली.

माळी म्हणाला 'ती पाहिलीस पलीकडची केवडयाची कुंडी?'

'मग?' भिकारणीनें माळ्यापासून दूर होत कांहींसे रागावून विचारलें.

'केवडयाच्या बुंध्याला बघ'

'अगबाई' भिकारीण भीतीनें कांपत माळ्याच्या आसऱ्याला जात कातरतेनें बोलली—

'साप! साप!!'

चवळीच्या शेंगापासली केवडयाची कणसें भिकारणीच्या पटकुरानें हललीं होतीं. साप हळूं हळूं बिळांत नाहींसा होत होता.

माळ्यानें त्याला मारलेंहि असतें.

इतक्यांत—

'चांगले खेळ चालू आहेत!'

माळी चपापून उभा राहिला.

मुख्य शिक्षकीणबाई शाळेच्या आवारांत राहात असत, त्या माळ्याकडे येत होत्या.

पोरसवदा माळ्याची बोबडी वळली. तशी भिकारीण म्हणाली,

'मी चवळीच्या शेंगा न्यायला आले होतें...केवड्याच्या कुंडींत साप होता...'

'हे पाहा ग्यानू, तुझ्या म्हाताऱ्या बापाच्या पश्चात् तुला चाकरी दिल्याचा हा प्रभाव होय! तरी मध्यें दोन महिने तुला नोकरीवरून काढलें...कां तें माहीतच आहे तुला...'

'मी लग्न नाही केलें म्हणून!' ग्यानबा शरमिंद्या स्वरांत म्हणाला.

'नोकरी सुटली तशी मिळालाच तुला जगाचा अनुभव. कुठेंसुद्धां कामधंदा लागला नाहीं. पुन्हां आलास माझ्या पायाशीं! होय ना?'

ग्यानबा अपराध्यासारखा उभा होता.

'पण...कारे ग्यानू...लग्न कां नाहीं जुळत तुझें अजून...लौकर आटप आतां लग्न...ही प्रौढ मुलींची शाळा आहे...'

'पण बाईसाहेब...'

'पण बीण कांहीं नाहीं! बाशिंग बांधून मोकळा हो! ह्या मुलींच्या शाळेंत जसा अविवाहित तरणाबांड मास्तर नको तसा माळीदेखील नको... मघांच्या सारखा थिल्लरपणा...'

'बाईसाहेब, तुमच्याच आग्रहानें तुम्हाला आवडतो म्हणून मी हा केवडा लावला. केवड्याला सापाचं भय असतं हें मी त्याचवेळीं नव्हतं का सांगितलं...'

भिकारीण म्हणाली, 'तसाच साप केवड्याच्या कुंडींत मी बघितला. ह्या ग्यानबानें मला वांचवलं...'

'समजलं, समजलं' मुख्य शिक्षकीणबाई उपाहासाचे हंसें हंसत म्हणाल्या, 'ग्यानू...माझी बदली झाली तर तूं इथें कसा टिकशील! काळजीच आहे मला मोठी!...बरें चल घरीं...आज रेडियोवर भूमिजनांचा कार्यक्रम आहे...तुला गाण्याची गोडी आहे...रेडियो ऐकायचा होता तुला!...'

भिकारणीनें आसपास पाहिलें, लूद भरलेलें कुत्रें तिच्या टमरेलांतला भात खात असलेलें तिला दिसले.

आपण आपल्याकरतां शिजवलेल्या अन्नात देखील कित्येक खेपेला आपला भाग नसतो.

§ § § §

भिकारीण फिरून त्या रस्त्यानें आली; तेव्हां तिनें ग्यानबाला कोरफड लावायला दिली.

'केवड्याच्या कुंडीजवळच ही कोरफड लाव म्हणजे साप यायचे नाहींत......तूं रात्रंदिवस बागेंत असतोस...मला भारी भय वाटतं तुला ते डसतील म्हणून...!'

ग्यानबा मनमोकळेपणानें म्हणाला, 'तूं भीक मागतेस याचं वाईट वाटतं मला. काळच कठीण आला आहे. मी तुला दिवसा दीड दिवसाचं काम देईन. ह्या बागेचं होळीत मोडलेलं कुंपण बसवाचंय्. सार्वजनिक इमारत ! त्यामुळें खर्चाला मंजुरी मिळायला उशीर लागतो...'

'पण मला मनांत आणलं तर भिक्षेवरच कमाई करतां येते...'

'ती कशी ?'

'गातां येतें मला !'

'वाः वाः मला तर गाणे फार आवडते ! आमच्या शाळेंतली गायन-मास्तरीण ? वशिल्यानें चिकटलीय् वाटतं !...ज्याला त्याला सांगते कुणीं दुष्टानं शेंदूर घातला न् माझा आवाज बिघडवला...!' ग्यानबा खूप हंसला.

'मी म्हणून दाखवूं तुला गाणं ?'

अन् भिकारणीनें एक चीज इतकी तद्रूपतेनें गायिली कीं ग्यानबाच काय परंतु जवळचा घोड्याला हौदांतले पाणी पाजणारा टांगेवालाहि संतोषानें बोलला,

'भले भले, काय मस्त गाते आहे पोरगी !!'

भिकारीण रोज त्या जागेवरून जात असे.

ग्यानबानें तिला बागेंतले मोलाचें काम कधीं दिले नाहीं. मुख्य शिक्षकीणबाई कांहीं बोलतील कीं काय याची धागधुग तर ग्यानबाला वाटत होतीच.

शिवाय—

भिकारीण जसजशी त्याच्याकडे आकृष्ट होत होती तसतसे त्याला तिचें महत्त्व कमी वाटत चाललें होतें.

ग्यानबाकडे भिकारीण व्याकुळ नजरेनें पाही—ग्यानबा तिला थोडें-बहुत उत्तेजन देत असे. कारण त्याला मुख्य अध्यापकीणबाईचे उद्‌गार आठवत 'ग्यानू, लौकर लग्न करून टाक.' नाहींतर नोकरी जाण्याची धास्ती! मग छोकरी नको निवडायला झटपट्....

ग्यानबा मराठी सहावी सातवी यत्तेपर्यंत शिकला होता. रोज तो शाळेंत सुंदर सुंदर तरुण मुली पाही. गाण्याचा त्याला षोक होता. तो रोज सिनेमाला जाई.

ग्यानबा एका अशा उंच पातळीवरच्या प्रेमाकडे बघत होता कीं, जी केव्हांहि त्याच्या हाताला लागण्याचा संभव नव्हता.

स्वत:ला सौंदर्याची खाण अशी बायको हवी ही इच्छा धरतांना आपलें रूप मात्र आरशांत बघण्याचें ग्यानबा अजिबात विसरला होता!

स्वप्नसृष्टी आणि व्यवहार यांतलें आभाळपाताळाचें अंतर जाणण्याचा शहाणपणा ग्यानबाला शिवला नाहीं; म्हणून तर ग्यानबाचें लग्न व्हायचें राहिलें होतें.

भिकारणीनें ग्यानबाकडे आर्ततेनें बघावें, ग्यानबानें आपला हात हातांत घ्यावा, तो प्रेमभरानें दाबावा, आपल्याला हृदयाशीं धरावें... किती किती यौवनसुलभ भावना तिच्या अंतर्यामांत थैमान घालीत होत्या!

परंतु तिचा प्रियकर तसें कांहींच करीना.

आतांशा तर ग्यानबा मोटारींतून शाळेंत येणाऱ्या रूपवान तरुण मुलींशीं, सिनेमा नटींशीं, मनानें लग्नें लावूं लागला होता!

भिकारीण निराश बनत चालली.

अखेरीस एक दिवस स्त्रिया सहसा आपण होऊन जे करत नाहींत तें तिनें केलें.

तिनें विचारलें, 'ग्यानबा?'

'काय?'

'शाळा मास्तरणीनें सांगितलें आहे ना!'

'आं?'

'लौकर लग्न करायला'

'हो' ग्यानबा तिरसटपणानें म्हणाला.

'पण ती जाईल निघून आठचार दिवसांत'

'म्हणजे!'

'बदली झाली आहे त्या मास्तरणीची'

'ग्यानबा' भिकारणीनें आपला थरथरता हात त्याच्या अंगाजवळ नेला.

ग्यानबा थंडपणाने दूर झाला.

'माझ्याशीं...लग्न...करशील...' भिकारणीनें आपल्या पायाकडे पाहात लाजत लाजत कसेबसे हें शब्द उच्चारले.

'वेडी...खुळी...मी कांहीं एवढा वाईट नाहीं...तुझी न् माझी बरोबरी!'

आजूबाजूला पाहात ग्यानबा आणखी पुढें म्हणाला,

'कुठें केवडा नि कुठें कोरफड!'

भिकारणीचें हृदय दुभंग झालें.

ती मागें न बघतां झपाट्यानें निघून गेली.

ग्यानबा कांहींच घडलें नाहीं अशा ऐटीनें हंसला.

किती बेजबाबदारपणें त्यानें एका अंतःकरणाचा चोळामेळा केला!

  

त्यानंतर माळ्याला पुन्हा भिकारीण दिसली नाहीं. ती परमुलुखाला राहून भिक्षेवर जीवन कंठीत होती.

गाण्याचे मधुर आलाप पुन्हां तिनें कधींच काढलें नाहींत.

मात्र कुठें केवडा दिसला कीं तिचे अंतःकरण भरून येई. केवडया-पाशीं तिचे पाय थबकत. आणि आजूबाजूला कुणी नाहीसे पाहून ती त्या केवड्याला नमन करी!

  

ग्यानबा माळ्याचे मनोरथ अखेर शेवटीं भिकारणीभोंवतीं घिरट्या घालूं लागले. पण ती होती कुठे?

ग्यानबानें केवड्याच्या कुंड्या लोकांना वाटायच्या ठरवल्या. पण सर्पाच्या भयाने कुंड्या नेण्यास कोणी तयार होईना.

बिनपाण्यानें ग्यानबानें केवडा मारला व सगळा केवडा त्यानें होळीला देऊन टाकला.

कोरफडीला मात्र ग्यानबा मुळींच विसंबला नाहीं. तो रोज न चुकतां कोरफड पाण्यानें भिजवी.

  

केस पिकेपर्यंत दोन्हीहि जीव जगले. पण एकमेकांना न दिसतां!

## कल्पवृक्षाचे काटे : : : ७

'आहेत कां बंगल्यांत साहेब ?'

'अरे, तुला कोण हवंय्' फाटकापासल्या भय्यानें विचारलें.

'असले तर त्यांना कळवा कीं मीं संजाणहून आलों. ते समजतील.'

'बरे बरे'

जरा वेळानें आंत बोलावल्यावरून तो खेडवळ इसम साहेबापुढें जाऊन उभा राहिला.

'काय तुझे नांव ? संजाणहून आलास होय ?' अद्यावत् पोषाख केलेल्या खुर्चीवरील मनुष्यानें तोंडांतील चिरुटाचा एक दम भरून सवाल टाकला. साहेबांचे मराठी उच्चार व मघांच्या भय्याचें मराठी बोलणें यांत फारसा फरक नव्हता.

परक्या वातावरणाने भांबावून गोंधळलेल्या अवस्थेंत तो गांवढळ इसम घाबरट आवाजांत म्हणाला 'रावसाहेब, मी विजापूर जिल्ह्यांतला, अबदुल-पुरचा राहणारा. फार जुनी गोष्ट......'

'खरेच! माझी जन्मभूमी अबदुलपूर...तिथला कां तूं......'

'हां जी. आपले वडील त्या भागांत असिस्टंट कलेक्टर असतांना त्यांनीं माझे शेत गहाण घेतले...त्याची मुदत आता सरत आहे—इतके दिवस मीच ते शेत खंडीत होतो—'

'अन् खंडाचे पैसे कुणाला देत होतास ?...'

'आपल्या मातोश्रींना! संजाणला दरसाली मी पैसे पोहोंचवीत होतो खंडाचे......त्यांच्याकडेच गेलो होतो...त्या गमावल्या म्हणे नुकत्याच.'

'हो, ती बातमी समजली मला!' साहेबांच्या स्वरातला पालट त्या अडाणी कुणब्याच्याहि ध्यानी आला. साहेबांचे आपल्या आईवर प्रेम असावे या वस्तुस्थितीची त्यानें तेव्हांच अटकळ केली.

'...या व्यंकोबाच्या इमानाबद्दल आपल्या मातोश्रींचा फार भरवंसा... माझी अडीअडचण बघत असे ती माउली......'

'मग म्हणणे काय आहे पुढें व्यंकोबा?'

'कांहीं नाही. तुम्ही शेत माझ्याच ताब्यांत द्या. माझ्याकडेच खंडाने लावा...मी चारशे रुपये खंड देत जाईन दरसाल......'

व्यंकोबाच्या मराठी बोलण्यांत कानडी हेल येत होते.

'ठीक ठीक, खंडाचा कागद करूया आपण. मी सवडीनें केव्हांतरी येईन अबदुलपूरला. माझे जन्मस्थान मला पाहिलेच पाहिजे. तुझ्या मर्जी-प्रमाणे सारे होईल...जा आतां......' साहेब चिरुटातली परटीच्या सद-ऱ्यावर सांडलेली राख झटकीत म्हणाले.

व्यंकोबा अदबीनें रामराम करून तेथून निघाला.

❀ ❀ ❀

कान्होपंतांची राहणी थेट साहेबी...

हा गृहस्थ हिंदू आहे याची अंधुक देखील कल्पना त्यांच्या इमारतींत बहिस्थानेच वावरणाऱ्याला येत नसे.

ते सणवारहि सगळे युरोपियन लोकांचेच पाळीत.

त्यांच्या पत्नीच्या कलानें अलीकडे बऱ्याच वर्षांत हा बदल पडला होता.

त्यांची बायको इंग्लिश होती.

आणि हेंच कान्होपंतांच्या आईचा लेकाशी असलेला संबंध तुटायला निमित्त घडले.

इंग्लंडमध्यें जमल्यास आय्. सी. एस्., निदान बॅरिस्टरीचा किताब तरी धारण करण्याच्या ईर्षेनें गेलेले कान्होपंत–शेवटीं कोणतीच पदवी न घेता एक इंग्लिश बायको घेऊन माघारी आले.

ह्याच फंदात सांपडल्यानें त्यांच्या परीक्षेवर पाणी पडलें होतें. पैसाहि पाण्यासारखा खर्च झाला.

कान्होपंतांचे वडील वारल्यास पुष्कळ वर्षे लोटली होती. त्यांच्या संजाण गांवीं राहिलेली कान्होपंतांची आई चिरंजिवाचे चाळे बघून शोकाकुल झाली. तिने त्याच्याशी आजवर सांधलेला मायापाश तोडून टाकला.

कान्होपंतांच्या सुदैवानें त्यांना मुंबईस अबकारी खात्यांत मोठ्या पगाराची नोकरी लागली.

ते सुस्वभावी होते. त्यांच्याबद्दल चर्चा होण्याजोगा एक विषय वगळला तर कान्होपंत व त्यांची पत्नी यांना नावे ठेवण्यास जागा नव्हती.

कान्होपंतांनी आपल्या आईशी सख्य जोडण्याचे यत्न केले, पण ते सर्व फुकट गेले.

हळू हळू ते अट्टल युरोपियन बनत चालले. 'क्राइस्ट कॉलनी' त त्यांची वस्ति होती. तिथे एकूण एक युरोपियन लोक. कान्होपंतांच्या घरची राहणीही त्यांच्या युरोपियन पत्नीनें अगदीं तिच्या पद्धतीबरहुकूम ठेवली होती.

कान्होपंत हिंदूंचे सणवार, तिथि, उत्सव, सगळे सगळे अजीबात विसरून गेले. इतकेंच नव्हे तर हिंदु धर्तीच्या वागणुकींत त्यांना कमीपणा वाटू लागला. त्यांची मायबोली मराठी भाषा आज कित्येक वर्षांनी ते व्यंकोबाशी बोलले.

तशीच जरूर आली तर त्यांच्या घरचा बहुतेक व्यवहार हिंदींतून चाले.

* * *

कांहीं वर्षे गेली.

मध्यंतरी कान्होपंत राहात होते त्या क्राइस्ट कॉलनींत एक किरकोळ फेरफार झाला.

त्यांच्या लगतच असलेला बंगला बरेच दिवस रिकामा होता. तिथे एक पोलिस सुपरिंटेंडेंट साहेब राहायला आले.

साहेब लोकांत प्रत्येकाची स्वतंत्र वृत्तीनें राहण्याची घाटणी. एवढें दिवस कान्होपंतांनीं आपल्या शेजारपाजारला कोण आहेत याचा कधींसुद्धां तपास केला नव्हता.

परंतु कान्होपंतांची व त्यांच्या नव्या शेजाऱ्याची लौकरच गट्टी जमली.

एकदां कान्होपंतांच्याकडे नवीन ऑर्केस्ट्राची रेकॉर्ड लावली होती. मिसेस् विल्सन यांना ती गोड वाटली. त्यांनीं पतिराजांना आग्रह करून ती कान्होपंतांच्याकडून मागवून आणली.

त्या दोन कुटुंबांचा घरोबा होण्याचे हेंच पहिले कारण. एकमेक आपला रेडिओ नादुरुस्त असला तर दुसऱ्याच्या रेडिओचा उपयोग करीत. फोनोच्या प्लेटींची तर सदाच अदलाबदल होई. विल्सन कुटुंबाला मूलबाळ नव्हतें. मिसेस् विल्सन यांनीं स्वतःचा आजार जोमात असतांनाहि कान्होपंतांच्या मुलांचे कितीतरी वेळां हौसेनें फोटो काढले होते.

त्यांत आणखी दोन्ही बिऱ्हाडांतील माणसांच्या प्रेमळ वृत्ती. त्यांची अलोलकीनें वागण्याची तऱ्हा—

—असेच कधीतरी कान्होपंत विल्सन साहेबाकडे बसायला गेले होते.

‘ हल्ली दुष्काळ चालू आहे म्हणे महाराष्ट्रांत ’ विल्सनसाहेबांनीं सहजगत्या विचारले.

‘ असं ? ’

‘ आमच्या खात्यांतले कांहींजण म्हणत होते बुवा ! तुम्ही मराठी वृत्तपत्रांत नाहीं कां वाचले ? ’

‘ मी मराठी केव्हांच वाचीत नसतो ’ कान्होपंतांच्या स्वाभिमानाला विंचू डसला.

‘ कांहीं कांहीं इंग्रजी पत्रांत सुद्धां दुष्काळाची भडक वर्णनें आहेत...’

'मग काय करायचे ?'

'तुम्हाला ठाऊकच आहे कीं मी चहाचे मळे खरेदी केले आहेत... तिकडे असेल कां हो दुष्काळ ?......'

'भलतेच ! दुष्काळ आमच्या शेतीवाडीकडे असायचा......'

'म्हणजे ! तुमची असली कांहीं जिंदगी आहे का काय ?'

'...ही शेतकरी माणसे पक्की डामरट असतात. माझी अबदूलपूरला चारशे रुपये खंडाची जमीन आहे. तेथचा आमचा शेत्या व्यंकोबा ! पहिली तीनचार वर्षे रक्कम व्यवस्थित आणून दिली......'

'अन् पुढें ?'

'लागला अळं टळं करायला. धान्याला भाव येत नाहीं म्हणतो. शेतकऱ्यांच्या हलाखीचे, दारिद्र्याचे मारे करुणपूर्ण वर्णन डोळ्यापुढें उभे करतो...फिर्यादीची धमकी दिली तर गयावया येतो......सारे ढोंगी......'

'कशावरून ?'

'कशावरून !! अहो अबदुलपूर ही माझी जन्मभूमिच. व्यंकोबाचे रडगाण्यात कितपत तथ्य आहे ते पाहावे व जन्मस्थानहि बघावे या दुहेरी हेतूनें मी अबदुलपूरला गेलो. व्यंकोबाला मुद्दामच कळवले नाहीं. म्हटले कांहींतरी बनावट सोंग निर्माण करायचा. गांवाबाहेर तंबू ठोकून एक दिवस राहिलो......काय ती खेड्यातली घामट राहणी......'

'मी गेलो नाहीं अजून येथल्या खेड्यापाड्यात......'

'जरूर जा म्हणजे तुम्हाला अनुभव येईल...लोक काळे कभिन्न, तरी प्रत्येकजण आपला चैनीत...मजेत. प्रत्येकाचे अंग उंची कापडानें आच्छादलेले. खुद्द व्यंकोबाला—आमच्या खंडकऱ्यालाच—दुरून न्याहाळला ना मी...डोक्यावर भरजरी तांबडा भडक मंदील...नवे कुडते, लग्नाचा वऱ्हाडी सजला आहे जसा. सांगा ही काय निर्धनतेची लक्षणें... ..'

'तुम्ही काय केलेत ?'

'मलां तिटकारा आला...त्याला ओळख न देतांच मी आलो निघून. ...लौकरच त्याच्यावर फिर्याद गुदरतो...अन् दुसऱ्या कुणाच्या तरी मळा हवाली करतो !—'

'लबाड माणसे भेटल्यानंतर असेच करायला पाहिजे' विल्सन साहेबांचा कान्होपंतांच्या सारखाच शेतकऱ्यांविषयीं प्रतिकूल ग्रह झाला.

* * *

मिसेस् विल्सन यांना उतार न पडता त्यांचे दुखणे एकसारखे वाढतच होते.

डॉक्टरांनीं सल्ला दिला कीं आजारी माणसाला कुठल्या तरी कोरड्या हवेंत कांहीं काळ ठेवावे.

विल्सनसाहेबांनी कान्होपंतांची मसलत घेतली.

कान्होपंत सहज म्हणाले 'आमच्या अबदुलपूरची हवा कोरडीच आहे. विजापूर जिल्ह्यातीलच गांव ते. असाच कुठला तरी पूर्वेकडील ठिकाणा वस्तीसाठीं निवडा—तुमच्या चहाच्या मळ्याकडे मेमसाहेब गेल्या होत्या. तरी त्यांच्यांत सुधारणा झाली नाहीं ना! पुन्हा तिकडे जाऊ नका! मीहि आलो असतो अबदुलपूरला, पण रजा मिळायचे चिन्ह दिसत नाहीं...'

विल्सन साहेबांनी चार महिन्यांची रजा काढली. त्यांनीं अबदुलपूरलाच जायचे ठरवले व गडी माणसासह आपली मोटार त्या दिशेला हांकारली.

अबदुलपूरला येऊन कांहीं फार दिवस झाले नव्हते विल्सन साहेबांना—

गांवापलीकडे कांहीं अंतरावर त्यांनीं तंबू ठोकला होता.

रोज गुरांचे कळपच्याकळप त्यांच्या तंबू समोरील रस्त्यानें जातांना दिसत.

सगळी जनावरें पोट खपाटी गेलेली. त्यापैकीं बरीच चालण्याचे श्रम न सोसून अधेमधेच मृत्युमुखी पडत.

गड्याला विल्सन साहेबांनीं एकंदर प्रकाराचा तपास घेण्यासाठीं पाठवले.

गडी म्हणाला 'साहेब, गांव दुष्काळानं बेजार झालें आहे. कसायांना शेतकरी गुरें विकत आहेत. आम्हाला पाणी मिळण्याचीहि मुष्कील पडते. मोटारीनें दूर जाऊन आम्ही डेरे भरून आणतो...'

मग विल्सन साहेबांनीं आजूबाजूची परिस्थिती बारकाईनें निरखली. त्यांना हिरवीगार फुलारलेलीं शेतें कुठेच आढळली नाहींत. साऱ्या निसर्गानेच शुष्क स्वरूप धारण केलेले त्यांना दिसलें.

दुसऱ्याच दिवशीं सकाळी विल्सनसाहेबांच्या डेऱ्यासमोर केवढा तरी शेतकऱ्यांचा जमाव जमला—

मेमसाहेब बावरून गेल्या. विल्सन साहेबांनाहि एकंदर काय प्रकरण आहे ते कळेना.

तरी विल्सनसाहेब धीट होते. हातांत पिस्तूल न घेताच चौकशी करण्यास ते पुढें सरसावले.

त्या शेतकऱ्यांच्या मेळ्यातील पुढारी इसम म्हणाला 'सारा मुलूख दुष्काळाने धाइधाई झाला आहे. जिथे माणसेच गाय बनली, तिथे गायींना काय देता—बैल, गायी, कसायांची धन होत आहेत. माणूस जगण्याची आज भ्रांत येऊन ठेपली आहे. सरकारनें शेताची पट्टीहि माफ केली नाहीं. गांवांतल्या विहिरी आटल्या. शेतकऱ्याच्या झोंपडींतला द्रव्याचा झरा तर कधीच पालवलेला नसतो. आपण आमचे माबाप; तुम्हीच प्रजेला संभाळले पाहिजे. काल तुमच्या मनुष्यानें आमची आस्थेने पूसतपास केली. आम्हाला मोठा विश्वास उत्पन्न झाला......'

विल्सन साहेबांचे हृदय मेणाहून मऊ झाले. ते म्हणाले 'जा—चिंता करूं नका...बाहेरगांवाहून मी धान्य मागवतो...तुम्हाला ते वाटण्याची व्यवस्था करतो लौकरच......'

खेडूतांचा जथा विल्सन साहेबांना दुवा देत इकडे तिकडे पांगला.

त्याच दिवशीं दुपारी—

शेतकऱ्यांची गाऱ्हाणी जोरदार शब्दांत मांडणारा त्यांचा म्होरक्या विल्सन साहेबांच्या तंबूत आला.

'कोणरे!'

'हुजूर...' त्याच्या डोळ्यांत आंसवे तरंगली.

'कां आलास?'

'घरांत माणसे भुकेने तडफडताहेत अन् त्यांत मालकांचा पैशाचा तगादा! ही बघा आत्ता नोटीस आली आहे—एका लिहिणा-वाचणाऱ्या माणसाकडे गेलो, तो म्हणाला खंड नाहीं दिला तर कब्जा भरण्याची ही नोटीस आहे...आपल्याकडेच पैसे द्यायला सांगितले आहेत मालकांच्या खंडाचे...'

'कोण तूं...कान्होपंतांचा शेतकरी...मालकाचा किती वर्षांचा खंड थकला आहे तुझा?' विल्सन साहेबांनीं रागाने विचारलें.

'मायबाप, शेतकरी हल्ली भयंकर हालांत दिवस ढकलीत आहेत. बाजार आज आमच्या ताब्यांत नाहीं. त्यामुळें धान्य उत्पन्न करूनहि त्याला भाव येत नाहीं...मातीच्या मोलानें तें विकावे लागते...तरी मी सतत तीन वर्षें खंड भरला...मालकांची आई अडचण बघून धान्यहि घेत असे...पण साहेबांना पैसेच द्यायला हवेत...आपण डोळ्यानें परिस्थिती पाहा. यंदा सरकारदेणे मोजायलासुद्धां त्राण नाहीं आमच्या जवळ. सारा न भरावा तर जप्तीची धास्ती. भरावा तर सावकार बोकांडी...अशा कात्रींत आम्ही जगावे तरी कसे...तुम्हीच सांगा...' व्यंकोबा आंतडे पिळवटून बोलत होता.

'......गेल्या साली कान्होपंत आले तेव्हां तूं मारे ऐटदार पोशाख घालून मिरवीत होतास!'

'केव्हां आले होते मालक! ठाऊकहि नाहीं!!'

'त्यांनी मुद्दामच तुला कळवलें नाहीं...तुम्ही सगळेच गांवकरी मजेत होता. भारी भारी कापडांत होता असें ते म्हणाले......'

'खास तेव्हां दिवाळी असेल! एरवी मी कधीच नवे कपडे घालायचा नाहीं...तो वर्षसण आम्ही हिंदू मोठ्या प्रमाणावर साजरा करतो...ऋण काढून आम्ही सण करतो...नाहींतरी शेतकऱ्यांच्या झोंपडींत सदाचाच दुष्काळ, सुबत्ता केव्हांच नाहीं...कधींतरी नातेवाईक जमवून गोडधड नको खायला? नेहमींचं दुःख नको विसरायला? आम्ही एक चैनीची आशा धरीत नाहीं, पण आमची मुलेलेकरे! त्यांना दिवाळीची हौस-मौज वाटते ना!'

व्यंकोबाचे म्हणणे विल्सनसाहेबांच्या अंतःकरणाला जाऊन भिडलें.

त्यांनी तावडतोब सविस्तर हकीगतीचे कान्होपंतांना पत्र लिहिले.

कान्होपंतहि कनकाळू दिलाचे होते. त्यांनीं व्यंकोबाला खंड माफ केला. इतकेच नव्हे तर दुष्काग्रस्तांना मदत म्हणून एक हजारांचा चेक पाठवला.

विल्सन साहेबांनीं कांहीं हजार रुपये या कामी खर्च करण्याचा कृत-निश्चय केला होता.

हलके हलके मेमसाहेबांना आराम वाटत चालला. त्यांचे दुखणे श्रीमंती होतें. दुष्काळी लोकांच्या कामांत मिसेस विल्सन यांनीं मन गुंतवायला सुरवात केल्यापासूनच त्यांच्या अंगांत एक तऱ्हेची हुषारी आलेली होती.

शेतकऱ्यांच्या आयुष्याविषयींच्या पूर्वींच्या स्वतःच्या विपरीत कल्पना एक दिवस विल्सन साहेबांनी व्यंकोबाला ऐकवल्या, तेव्हां तो म्हणाला;

‘साहेब, हे असेच आहे. शेतीच्या धंद्याचा अनुभव नसलेले आम्हाला लबाड ठरवतात. त्यांची ही दिशाभूल आहे. त्यांनीं आमच्या बाबतींत जो कल्पवृक्ष उभा केला आहे त्याचे कांटे मात्र आम्हाला बोंचताहेत... पुष्कळांना याची जाणीव आहे, पण आमची बिघडलेली घडी दुरुस्त होण्याचा रंग अजून दिसत नाहीं......’

# रेशमा : : : ८

त्याच्या हातांतील बाभळीच्या डिंकाची बादली लटपटत होती. खांद्यावरच्या शिडीचा भार त्याला सहन होईनासा झाला होता. जाहिरातीचें पुडकें घेतलेला त्याचा डावा हातहि थरथरत होता.

दोन दिवसांत दारूला अजिबात न शिवल्यानें परसू भिल्लाच्या डोक्यांत शिणका येत होत्या. मध्यरात्रीच्या अंधारांत पाय ठेंचाळत होते, तरी तसाच परसू आपलें काम करीत चालला होता.

कोपऱ्यावरील घराच्या भिंतीवर परसू भिल्लानें आपली शिडी लावली व जाहिरात चिकटवण्यास तो वर चढला.

त्या भिंतीला एक झरोकेवजा खिडकी होती. परसूची नजर सहज आंत गेली. त्याचे डोळे एकदम विस्फरित झाले. त्याची मुद्रा लाल झाली. परसूनें हाताच्या मनगटानें खिडकीला दणके मारले.

शिडी डळमळली. परसू रस्त्यावर पडला. डिंकाच्या बादलीच्या कांठावर त्याचें कपाळ आपटलें व त्यांतून रक्त भळभळूं लागलें.

ज्या घरावर परसू जाहिरात लावीत होता, तेथील पठाण मालक, झालेल्या खडबडाटानें रस्त्यावर आला.

'ए मकराणी, दारू पाजून माझ्या घरादाराचं वाटोळं केलंस, अन् आमच्या मुली पळवतोस!'

परसू भिल्ल ओरडला.

इतक्यांत दारांतला पडदा फाटल्याचा आवाज झाला. मकराणीनें सुरमा फांसलेलीं डोळयांचीं बुबुळें मागें वळवलीं. त्याच्या घरांतलीं भिल्लाची पोर पळत होतीं.

तिच्या पाठलागाला जाणाऱ्या मकराणीचें तंगडें परसूनें निजल्या निजल्या घट्ट धरलें.

दोघांची झटापट उडाली.

लोक जमले. त्यांनीं मारामारी थांबविली. परसूच्या हातांतली जाहिरात लिहिणें-वाचणें येणाऱ्या मूठभर सुशिक्षितांनी वाचली,

'आज दारूबंदीची सभा आहे.'

'माझ्या घराच्या भिंतीवर असली जाहिरात अन् हा परसू गुत्त्यावर हम्मेष चकरा घालणारा–' असें चरफडत मकराणी निघून गेला.

मंडळींची पांगापांग झाली.

* * *

परसूला पायीं जाववत नव्हतें. रानगाईवर बसून तो बाजारांत चालला होता.

भिल्लांचीं घरें एकमेकाला खेटून नसतात. प्रत्येकाच्या शेतामळ्यांत त्याची वस्ती.

रानगाय सावकाश वाटचाल करीत असतां मध्येंच एका तरुण भिल्लिणीनें परसूला गांठून विचारलें,

'तमाखू आहे का जराशी?'

'कशाला?'

‘ चिलीम ओढायला ’ तिनें परसूसमोर चिलीम धरीत म्हटलें.

कनवटीचा कसा चांचपीत परसू बोलला,

‘ तमाखूची चिमूटदेखील नाहीं, बुवा ! ’

परसू पुढें निघाला; पण पुन्हा रानगाईची गति मंद करीत म्हणाला,

‘ बरी आठवण झाली. तुम्ही कुठल्या बाजूला राहतां ? ’

‘ आपण त्याच दिशेला चाललों आहोंत. मी रेशमा भिल्लीण, माझ्या भावाचा मळा आहे, त्यांत मी राहतें...’ तिनें पत्ता सांगितला.

‘ तुमचा भाऊ...गुत्त्यावर येत असे कां तो ? ’ परसूनें विचारलें.

‘ अगदीं अट्टल दारूबाज ! ’ रेशमा हंसत म्हणाली, ‘ एका दारूड्याची अशी गोष्ट सांगतात. घरच्या माळवदावरून तो दारूच्या निशेंत खालीं आला. दांताड फुटलें, त्याचे पुढले दोन दांत पडले. ते त्यानें सोन्याचे लावले, व दारूला पैसे नाहींत म्हणून तेच दांत उपटून विकले ! तशांतला आहे माझा भाऊ. खिस्तांव झाला आहे तो.’

‘ मी दारूला शिवायचं नाहीं अशी प्रतिज्ञा केली आहे. दारूबंदीच्या चळवळीसाठीं कांहींजण इकडे आले आहेत त्यांना मदत करतों मी. अरेच्या, विसरलोंच ! आज सभा आहे हें मला तुम्हाला सांगायचं होतं.’

‘ सभा ? म्हणजे ? ’

‘ आपल्या भिल्लांनीं एके ठिकाणीं जमायचं. दारू सोडण्याचा उपदेश देशभक्त करणार. मला भेटेल त्याला सभेला येण्यासाठीं कळवायला बजावलं आहे. जाहिरातीहि काल मी चिकटवल्या.’ परसूनें सहजगत्त्या कपाळाला बांधलेल्या पट्टीला हात लावला.

‘ कपाळाला काय लागलं तुमच्या ? ’ रेशमानें विचारलें.

‘ हं: ! कालचा प्रताप ! ’

‘ मी नाहीं समजलें ? ’

‘ चारपांच गांवं मिळून त्या मकराणीचा गुत्ता नाहीं का, त्याच्या घराच्या भिंतीवर जाहिरात डकवायला चढलों. मला नीट दिसलं नाहीं. आमच्याच जातीच्या मुलीशीं—’

परसूच्या तोंडून शब्द बाहेर पडेना. संतापानें मुठी आंवळीत तो म्हणाला,

'खून करीन त्या मकराण्याचा, नाहीं तर मी तरी मरेन, तरच नांवाचा परसू!'

रेशमाच्या चेहऱ्यावर स्मिताच्या लहरी उमलल्या. ती हंसून म्हणाली,

'अहो परसू भिल्ल, मी तुमच्यापाशीं कां तमाखू मागितली तें आलें ध्यानांत?'

परसूनें नकारार्थी मान हालवली.

रेशमा म्हणाली, 'मला मकराण्याची भीति वाटते. इथं शुकशुकाट आहे, सोबत आपल्या जातीचा धडधाकट माणूस पाहिजे.'

'तुम्ही दारू नाहीं पीत त्याच्या गुत्त्यावर?'

'पिते कीं! पण आतां नाहीं पिणार!'

'एकाएकीं ठरवलंत?'

'तुम्हीं नाहीं पीत हें कळलं म्हणून! दारूच्या नादानंच माझ्या सख्या भावानं मला मकराण्याच्या हवालीं केलं. काल तुम्ही सोडवलेली मुलगी ती मींच.'

'खरंच!'

उत्तरादाखल रेशमानें हास्य केलें आणि तंबाखू काढून चिलीम पेटविली.

चिलिमीचे झुरके मारीत परसूनें रेशमाला घरीं पोचवलें व रानगाय हांकारीत म्हटलें,

'सभेला यायचं विसरूं नका बरं का!'

ठरल्यावेळीं दारूबंदीची सभा भरली.

परसू हजर होता. रेशमासुद्धां आपल्या मैत्रिणींना घेऊन आलेली होती.

सभेंत जे भिल्ल जमले होते, ते सारे आपले भाईबंद आहेत असेंच जो तो समजत होता. परंतु त्यांमध्यें कित्येक मकराणीचे पाळीव गुंड होते.

पहिल्या वक्त्याच्या भाषणाचा इष्ट तो परिणाम व्हायच्या आधींच हुल्लड माजली.

रेशमावर गुंडांचें विशेष लक्ष आहे हें दिसतांच परसू तिच्या संरक्षणाला धांवला. त्यानें स्वतःकडून शिकस्त केली. सगळ्यांनींच परसूला घेरून बेदम चोपलें. परसू आपल्या बरोबरीच्या दहाजणांना भारी होता; पण नुकतीच

त्याला जबर दुखापत झालेली ! अशा स्थितींत लौकरच घायाळ होऊन तो निपचीत पडला.

शुद्धीवर आल्यानंतर परसूनें रेशमाचा पुष्कळ शोध केला.

रेशमाचा भाऊ त्याला म्हणाला,

'जवळच कुणीं गुलाबमहाराज नांवाचा साधु रहातो. मला किरिस्तावाला काय करायचं जाऊन तिकडे ? तूं त्याला रेशमासंबंधीं विचार.'

स्वतः दारूसाठीं धर्म सोडणाऱ्या, आपल्या बहिणीला मकराण्याच्या ताब्यांत बिनदिक्कत देणाऱ्या रेशमाच्या भावाचा हा सल्ला एरवीं परसूनें धुत्कारला असता; पण बुडत्या परसू भिल्लाला तेवढाच काडीचा आधार असल्यानें, तो गुलाबमहाराजांकडे गेला.

तेथील वातावरणाची परसूच्या मनावर मोठीच छाप पडली. गुलाबमहाराजांचे अगणित भिल्ल शिष्य होते. दारू प्याल्यास सद्‌गति मिळत नाहीं असें ते सांगत. अनेकांनीं गुलाबमहाराजांच्या उपदेशानें दारू सोडली होती. दारूबंदीच्या प्रचाराच्या हजारों सभा भरवून जें होणार नाहीं तें लोकांच्या धर्मभावना हालवतांच घडून आलें.

परसूनें गुलाबमहाराजांना रेशमाबद्दल प्रश्न टाकला.

महाराजांनीं परसूचें नांव विचारून घेतलें व म्हटलें, 'अशीच एक मुलगी तुझा तपास काढण्याकरतां मला भेटली होती; पठाण येऊन तिला घेऊन गेला; त्याच्याशीं निका लावला आहे तिनें. तुझ्या कपाळाला खोंक पडलेली आहे, हीच खूण तिनं सांगितली.'

त्या मुलीचें एवढें हुबेहूब वर्णन गुलाबमहाराजांनीं केलें कीं परसूला तीच रेशमा याविषयीं तिळमात्र संशय उरला नाहीं.

परसू महाराजांचा आशिर्वाद न घेतां तसाच दूर निघाला.

XX XX XX

त्यानंतर जागोजागीं दरवडे पडूं लागले. सावकारी करणारे पठाण लोक लुटले जात. दारूचें गुत्ते फोडण्यांत येत.

पश्चिम खानदेशांत एका पारशानें ताडीची खूप लागवड केली होती. त्यांतील बरींच झाडें तोडण्यांत आलीं. यंत्रानें ताडीच्या झाडांना पाणी

पुरवण्याची जी व्यवस्था होती ती उध्वस्त झाली. रॉकेल तेलाच्या पिचकाऱ्या मारून ताडीचीं पिपें नेणाऱ्या मोटारी जाळण्यांत आल्या.

सरकारनें दरोडेखोरांना पकडून देणारास मोठें बक्षिस ठेवलें. अजून एकसुद्धां भिल्ल हातीं सांपडला नव्हता. दरोडेखोर सिंगपूर वगैरे ठिकाणच्या भिल्ल राजांचा आश्रय घेत व सातपुडा पर्वतांत नाहींसे होत.

ॐ ॐ ॐ ॐ

'या तुम्ही !'

सातपुडा पर्वताच्या खोऱ्यांत एक खोपट होतें, त्याच्या दारांशीं उभीं राहिलेली एक भिल्ल तरुणी आलेल्या वाटसरूचें स्वागत करीत होती.

'इथं रात्रीपुरती माझी व्यवस्था होईल कां ?' वाटसरूनें विचारलें. त्याचा आवाज परमावधीचा निराशायुक्त होता.

'अलबत् ! या बाहेरच्या सोप्यांत खुशाल झोपा'

प्रवासी भिल्ल थकलेला होता. तो थोड्या अवकाशांत गाढ निजला.

कोणी तरी गदगदून हालवीत असतां तो नाखुषीनें इकडचा तिकडच्या कुशीवर झाला.

'जा ! जा ! अहो, परसू भिल्ल, पळा तुम्हीं;आत्तां धरायला येतील ते—'

स्वतःच्या नांवाचा उच्चार होतांच परसू ताडकन् उठून बसला.

'कोण ! रेशमा !' तिच्या जवळच ठेवलेलें चहाचें भांडें घेत त्यानें आश्चर्यानें म्हटलें.

'पिऊं नका तो गुळाचा चहा ! त्यांत गुंगी आणणारी औषधी मुळी उकळली आहे.' परसूच्या हातांतलें भांडें हिसकून त्यांतला चहा रेशमानें ओतून दिला.

परसू तिच्याकडे पाहतच राहिला !

'जा म्हणतें ना ! मी चांडाळीण आहे. दरोडेखोरांसाठींच मीं इथं राहिलें;—पण दरोडेखोरांत तुम्हीं असाल—निघा—पोलिस धरायला येतील—' रेशमा स्फुंदूं लागली.

'रेशमा !' परसूनें तिचा हात पकडला; तिच्या तोंडाजवळ तोंड नेलें; पण ताडीचा भपकारा येतांच ते दूर नेत त्यानें विचारले—

'तूं दारू टाकली होतीस ना ?'

‘ माझी कांहींच चौकशी करूं नका. मी अभागी आहे. आतां सुख पुढच्या जन्मीं—’ रेशमाचे अंग कांपत होते.

‘ माझें तरी दैव कुठं जोरांत आहे ? मीं तुला मकराण्यापाशीं प्रथम बघितलं, तेव्हांच माझं कपाळ फुटलं. नशिबानं इषारा दिला.—अशी घाबरूं नकोस. येऊं दे कोण येतंय् तें. मी आहें समाचार घ्यायला समर्थ ! ’

‘ दरोडेखोरांच्या टोळीला धरण्याकरितांच मी राहिलें हो; माझ्या नवऱ्याच्या सांगीवरून. ’

‘ तुझा नवरा ! ’

‘ हो ! तो आपल्या गांवचा गुत्तेदार मकराणी. त्या दिवशीं मला सभेंतून बळजबरीनें पळवून निका लावला त्यानं माझ्याशीं.—मीं गुलाब महाराजांना कांहीं तरी सबब काढून एकदां भेटलें—’

‘ असं ? ’

‘ आमचा गुत्ता बंद पडला. गुलाब महाराजांच्या शिकवणीनं कुणी दारू पिईना. गुत्त्यावर दरोडेही पडले. सरकारनें दरोडेखोरांना पकडणारांना इनाम लावलं आहे. त्यांचा म्होरक्या जो धरील, त्याला आणखी वेगळें बक्षिस आहे. याच कामावर हत्यारी पोलीस घेऊन मकराणी आला आहे. ’

‘ मिळवूं दे त्याला बक्षिस ! मला तरी जगून काय करायचं ? आज़ पंधरा दिवस झाले, माझे साथीदार बेपत्ता आहेत ! ’

‘ ते इथं विश्रांतीला आले होते...त्यांना वाटलं. आपल्या जातीची बाई...मीं चहांतून गुंगीचं औषध पाजलं ! ’

‘ त्यांच्या या पुढाऱ्यालाही असंच कर—आपल्या भाऊबंदाचा गळा कापलास ! ’

‘ तुम्हालाही चहा देणार होतें—तुमच्या कपाळावरच्या जखमेची खूण उजेडांत दिसली. तुमच्याजवळच्या भाल्यावरून कळलं, तुम्हीं दरोडेखोर आहांत—रात्रींच मी वर्दी देवून चुकले हो—तो पाहा हत्यारी पोलिस घेऊन नवरा येतो आहे. पळा—पळा ना मागल्या बाजूनं, मी वाट दाखवते...’

त्याला बळेंच उठवण्याचा प्रयत्न करीत रेशमा आर्जवानें म्हणाली.

परसू बोलला,

'मकराणीचा गुत्ता चालत नाहीं—त्याला इनाम मिळालं कीं दारूगुत्ता फिरून उघडायला नको; तूंही चैनींत राहशील...'

'नका हो असें मनांत आणूं!'

'हा मी स्वाधीन होतों त्याच्या. रेशमा, तूं याच जन्मी सुखी हो.'

परसू भिल्लानें रेशमाचा हात झिड्‌कारला. कमरेचा भाला लांब भिरकावला, आणि दोन्हीं हात वर करून तो समोरून हत्यारी पोलिसानिशीं येणाऱ्या मकराण्याच्या दिशेला झरझर निघाला.

'जाऊं नका परसू भिल्ल, मागें फिरा. नाहींतर हा भाला छातींत खुपसून मी जीव देईन....'

रेशमाकडे परसूनें वळूनदेखील पाहिलें नाहीं. !

# अहेराचा अहेर : : : १

आज रावसाहेबांच्या मुलीच्या लग्नाला जातांना अहेर काय द्यावा ही सुभद्रेला पंचाईत पडली.

सुभद्रेचा नवरा वसंतराव हा ज्या फर्ममध्यें कारकुनी करीत होता त्याच फर्मचे रावसाहेब म्हणजे मुख्य मॅनेजर. त्यांनींच वसंतरावला नोकरीस लावून घेतले होते·

वसंतरावास सारा पंचवीस रुपये पगार होता. त्यांत नवराबायकोचा जेमतेम प्रपंच भागत असे. वसंतराव हुषार होता. मॅट्रिकच्यापुढें कॉलेजचीहि त्याची एकदोन वर्षे झाली होती. त्याचा प्रारंभापासून ओढा लेखनाकडे होता. पण नोकरी आवडीप्रमाणें मिळूं शकली नाहीं. अलीकडे त्यानें स्वतःच्या स्वाभाविक कलाकडे फुरसतीचें क्षण खर्ची घालून एक कादंबरी प्रसिद्ध केली होती.

अहेराला पैसे नेणें शक्य नाहीं हें सुभद्रेनें पाहिलें. मग काय नेतां येईल याचा ती विचार करूं लागली. चांदीची नथ ठेवण्याची डबी किंवा असेंच कांहीं तरी...एकादें दुसरें लुगडें...तिनें पुष्कळ गोष्टींचा विचार केला पण कोणतीच जमेना.

इतक्यांत तिच्या मनांत एक कल्पना आली.

'खरेंच! त्यांनीं लिहिलेल्या कादंबरीच्या दोनतीन प्रती शिल्लक आहेत. एक देऊं का? हो द्यावीच. आपण वाचली नाहीं कां! किती सुंदर आहे कादंबरी!! अनायासे रावसाहेबांना तिकडचा एक गूणहि कळेल.'

तिचा कादंबरी नेण्याविषयीं बेत कायम झाला. वसंतराव कामाला गेला होता. तिनें त्याच्या कपाटांतील एक प्रत घेतली व घरास कुलूप लावून ती निघाली.

रावसाहेबांना महिना दोनशें रुपये पगार होता. ते ज्या कंपनींत काम करीत होते तिचें ते मुख्य मॅनेजर. अर्थात् कंपनीचे सगळे चाकर नोकर त्यांच्याकडेही राबत. शिवाय रावसाहेबांना चैनींत राहण्याची संवय फार! त्यांचें वागणें नेहमी साहेबी थाटाचें असें.

त्यांतून आतां त्यांच्या एकुलत्या एक मुलीचें लग्न. मग काय?

पैसा नुसता पाण्यासारखा खर्च होत होता!

आजचा अहेराचा दिवस. रावसाहेबांच्या मोठमोठ्या ओळखी असल्या-मुळें अहेराला तीस रुपयांच्या खालीं कोणी कांहीं दिलें नाहीं. थोड्या-वेळानें सुभद्रा पुढें आली. अहेराकरितां तिनें पुढ्यांत पुस्तक टाकलें. आपलें सुदाम्याचे पोहे यांना कितपत रुचतील? आतांपावेतों दर अहेराला तीस रुपयांच्या वर नोटा घेणाऱ्या रावसाहेबांना व बाईसाहेबांना आपला अहेर कितीसा आवडेल; ही शंका सदोदीत तिच्या मनाला खात होती.

आणि ती शेवटीं खरी ठरली.

रावसाहेबांच्या बायकोनें—म्हाळसाकाकूंनीं—सुभद्रेकडे उपहासात्मक दृष्टीनें बघितलें.

आजूबाजूची कुजबूज तिला ऐकूं आली. एकजण म्हणत होती, 'कोण ग ही?'

'अग रावसाहेबांच्या ऑफिसांत तो कारकुंडा आहेना; त्याची बायको.'

दुसऱ्या दिशेकडून अशाच मासल्याचा उद्गार तिच्या कानीं आला. कोणी तरी बोललं 'घरांत पुस्तकांच्या खूप प्रति पडून असतील तेव्हां दिली एक झाले! तेव्हढेच पैसे वांचले. तेवढाच खप.'

रावसाहेबांनीं हंसत हंसत पुस्तक उलटसुलट पाहिले व म्हटलें 'हें कोणाचें? वसंतरावाचें प्रकाशन वाटतें? हे असले उद्योग करतो! तरीच हपीसाच्या हिशेबांत नेहमी चुक्या आढळतात! एकना धड भाराभर चिंध्या!'

आपल्या दारिद्र्याचा होत असलेला उपमर्दही सुभद्रेनें कदाचित् सहन केला असतां, पण आपल्या पतीचा चारचौघांदेखत झालेला अपमान तिला मानवणें अशक्यप्राय ठरलें. ती तडक घरीं निघाली.

जातांना तिच्या मनांत विचार चालले होतें.

'दारिद्य हा दोष आहे कां? खात्रीनें नाहीं. कित्येक वेळां अंगीं करामत असूनहि परिस्थिती माणसाला दीन करून सोडतें. त्याला वर येऊं देत नाहीं. पूर्वीच्या काळीं इंग्रजी चारपांच बुकें शिकलें कीं दीडशें दोनशें रुपये सहज पगार मिळे आणि आतां पूर्वीच्या तिप्पट अभ्यास केला तरी बेकारीचा टिळा कपाळीं लावून हिंडणे नशिबी येतें. हा मुद्दा त्यांनींच नाहीं कां आपल्या कादंबरींत विशद केला? त्यांना पाणउताऱ्यानें बोलले रावसाहेब सभोंवारच्या मंडळीसमक्ष! खरेंच ते हिशेबांत घोंटाळे उत्पन्न करीत असतील? तसे असेल तर? बाकी त्यांना सांगतेंच आल्यावर. नाहीं-तर मिनतवारीनें पदरीं पडलेल्या चाकरीवरहि पाणी पडायचे!'

सुभद्रा घरीं आली. वसंतराव संध्याकाळीं ऑफिसमधून माघारी येई-पर्यंत अशाच प्रकारचे विचार तिच्या मनांत उसळत होते.

वसंतराव सायंकाळच्या सुमारास आल्यानंतर त्यास तिनें सर्व हकीकत निवेदन केली.

वसंतराव म्हणाला 'माझ्या कादंबरीचा अवमान केल्याबद्दल मला नाहीं विशेष वाटत. मी तरी कुठें एवढा प्रख्यात लेखक आहे! हौसे-खातर व थोडेफार कळकळीनें लिहितों झालें! पण माझ्या कामांबद्दल राव-साहेब हेटाळणीनें बोलले म्हणतेस तर ऐक. आतां कंपनीच्या नियमाबर-हुकूम वर्षअखेर आहे. फर्मचे सगळें हिशेब मालकांस दाखवावयाचे

आहेत; आणि जमेंत तीन हजार रुपयांची तूट येते आहे. लोक बोलतात पैसे रावसाहेबांनीं खाल्ले. मी तसें कसें म्हणूं? मला त्यांचा अनुभव नाहीं. आज कामधंद्याला लागून वर्षसुद्धां पुरें झालें नाहीं. शिवाय मला रावसाहेबांनींच कंपनींत नोकरीला चिकटविलें. तरीपण मी लबाडी करणार नाहीं. आहे तसा जमाखर्च मालकापुढें मांडणार, मग मालक जाणें आणि रावसाहेब जाणें!'

वसंतरावाच्या या भाषणानें सुभद्रेला जरा बरें वाटलें. सकाळी झालेल्या गोष्टीबद्दलची तिच्या अंतःकरणांतील रुखरुख ओसरली. नंतर बराच वेळ इतर विषयांवर दोघां पतिपत्नींचीं बोलणीं झालीं.

ᴥ ᴥ ᴥ

रावसाहेबांकडील लग्न संपलें, सगळयांच्या अहेराचे पैसे, उंची लुगडी, शालू व पैठण्या खरेदी करण्यांत आणि विवाहांत दारू उडविण्याची हौसमौज भागवण्यांत खर्च झाले! आणि सुभद्रेचा अहेर?

तिचा अहेर...तिच्या नवऱ्यानें लिहिलेली कादंबरी...तिला प्राणप्रिय वाटणारें पुस्तक......

रावसाहेबांच्या घरांतील माळावर रद्दीच्या खोक्यांत पडलें होतें!

  

पुढें एक दिवस वसंतरावाची नोकरी सुटली. सुभद्रेनें कारण विचारलें. तो म्हणाला, 'रावसाहेब तूट आलेलें तीन हजार रुपये दुसऱ्या कुठल्यातरी खात्यांत खर्ची घाला असें सांगत होतें, अर्थात् मी तसें केलें नाहीं. मला ठेवले तर त्यांच्या गळयाशीं बेतणार हें स्पष्ट झालें म्हणून त्यांनीं दुसरा कारकून पदरीं बाळगला!'

रावसाहेबांनीं वसंतरावाला काढल्याची बातमी आपल्या पत्नीला जेव्हां निवेदली तेव्हां म्हाळसाकाकू म्हणाल्या 'बरें झालं. काय बाई त्याची बायको तरी! थोरामोठ्याकडे जायचे तर अहेर काय आणला होता? एक भिकारडे पुस्तक घेऊन आलीं होती! श्रीमंतांची थट्टा केली म्हणजे असेंच व्हायचें!'

ॐ ॐ ॐ

या गोष्टीला पांच वर्षें लोटलीं. रावसाहेबांना आपल्या अधिकारांत पैसे खाण्याची लागलेली चटक त्यांच्या अंगाशीं आली.

कंपनीला फायदा कांहींच होईना. तेव्हां मालकालाहि संशय आला. कारकुनाला त्यानें विचारलें. मॅनेजरपेक्षां मालकांशीं इमानदारी दाखवणें कारकुनास फायद्याचे वाटलें. त्यानें खरी हकीगत सांगितली.

रावसाहेबांना अर्धचंद्र मिळाला. त्यांना खटला करून तुरुंगांत घालण्याची धमकी देण्यांत आली. रावसाहेबांनीं कसेंबसें शिलकेंतलें दोन अडीच हजार रुपये देऊन मालकांस गप्प केलें.

नोकरी गेली. थोडाफार पैसा शिल्लक होता तोहि जवळ उरला नाहीं. हातास लागलेली सढळ खर्च करण्याची संवय जाणें शक्य नव्हतें. बरे, रावसाहेबांचें वय चाळीशीच्या बाहेर गेलेलें. नोकरी कोण देतो ?

घरचे उंची फर्निचर विक्रीला जाऊं लागलें ! म्हाळसाकाकूंचे दागिने गेले ! फक्त जरुरीपुरतेच सामान ठेवण्यांत आलें. रावसाहेब शहर सोडून स्वतःच्या खेड्यांतील वाड्यांत येऊन राहिले.

रावसाहेब—बाकी आतां त्यांना रावसाहेब कोण म्हणतो, हरिहररावच म्हणत—विचार करण्यांत आपला सारा दिवस घालवीत. कांहीं उद्योग नसल्याकारणानें त्यांना वेळ जातां जाईनासा झाला. शिवाय आपलें मागचें वैभव आठवून तें कित्येक समयीं बेचैन होत. म्हाळसाकाकूंचीसुद्धां ती स्थिती झाली.

ते घरांतील पुस्तकें वाचून आपला काळ बहुधा व्यतीत करीत. एक दिवस कुठलीतरी नवलकथा वाचीत असतां ते फारच तल्लीन झाले. कादंबरींतील गरिबीश्रीमंतीचा सफाईनें सोडवलेला प्रश्न, लेखकाचें कथनकौशल्य, त्याचें भाषेवरील प्रभुत्व, सर्वच हरिहररावांना पसंत पडलें. पुस्तक संपल्यावर त्यांनीं लेखकाचे नांव पाहिलें. तो काय आश्चर्य ? वसंतराव त्याचा लेखक होता !

त्यांनीं म्हाळसाकाकूंनाहि ती कादंबरी वाचून दाखवली. त्यांनादेखील ती फार आवडली. पुस्तक वाचल्यानंतर रावसाहेब म्हणाले ‘आणि या कादंबरीचा लेखक कोण तें माहीत आहे कां ?’

‘काय नांव सांगा पाहूं ?’ किंचित् जिज्ञासेनें म्हाळसाकाकूंनीं विचारलें.

'अग वसंतराव ! माझ्या ऑफिसांतील एक कारकून. पण आपल्या इथें हें पुस्तक कसें आलें बुवा ?'

'अहो ! कुसुमच्या लग्नाच्या वेळीं त्यांच्या बायकोनें अहेर नव्हता कां केला ?' म्हाळसाकाकूंच्या डोळ्यास आतां पाणी आले ! 'त्याचा आपण अव्हेर केला ! त्यावेळीं आपल्याकडून किती या बिनमोल अहेराचा उपहास झाला ! आणि त्या कारकुनाची पत्नीदिखील बिचारी त्यावेळीं माघारी गेली !'

'मीहि वसंतरावचें गुण न जाणून त्याला कामावरून कमी केला. कृतकर्माचीं फळें आपण भोगतोंच आहोंत !' हरिहररावांनाहि वाईट वाटलें ! 'आतां मी ही कादंबरी जेथें प्रकाशित झाली आहे त्या छापखान्याचें मॅनेजरनां पत्र पाठवितों म्हणजे आपणांस वसंतरावाचा पत्ता समजेल. झालेल्या बाबीविषयीं दिलगिरी तरी प्रदर्शित करूं. आतां काय तेवढेंच आपल्या हातांत आहे !'

हरिहररावांनीं वसंतरावाचा शोध काढला.

त्यांनीं वसंतराव व सुभद्रा या उभयतां पतिपत्नींना स्वतःची हकीगत सविस्तर रीतीनें निवेदन केली. दुर्गुणांचीं पतनें कशीं निस्तरणें आलें याचा पाढा गाइला. स्वतःच्या नि म्हाळसाकाकूंच्या वर्तणुकीबद्दल वसंतराव व सुभद्रा क्षमा करतील ही आशा प्रगट केली ! पत्रांत वसंतरावाच्या लिखाणाची स्तुति करण्यासहि हरिहरराव विसरले नाहींत ! सरतेशेवटीं त्यांनीं आणखी पुस्तकें लिहिलीं असल्यास तीं व्ही. पी. नें पाठविण्यांत यावीं म्हणून विनवलें.

दोनतीन दिवसांत पांचसहा पुस्तकें हरिहररावांस सप्रेम भेट म्हणून आलीं. निबंध, कविता, कादंबऱ्या हे प्रकार त्यांत होते. पुस्तकांच्या प्रतीवरून वसंतराव किती नामवंत लेखक आहे हेंहि त्यांस अजमावतां आलें.

पुढें कित्येक दिवस हरिहरराव व वसंतराव यांचा पत्रव्यवहार चालला होता. वसंतराव हरिहररावांचा उल्लेख 'रावसाहेब' या पहिल्या पदवीनेंच करी ! या बाबतींत हरिहररावांचें ऐकायचेंच नाही असें त्यानें ठरवलें होतें.

सुभद्रेनें एकदां दोनदां म्हाळसाकाकूंना पत्र पाठवलें होतें. सुभद्राला दोन मुलगे आहेत हें वृत्त कळलें तेव्हां म्हाळसाकाकूंस आनंद वाटला.

कांहीं काळानें स्वतःचे संपादकत्वाखालीं वसंतराव एक मासिक चालवूं लागला. त्याची लोकप्रियता व व्यापहि फार वाढला. याच मासिकाच्या कचेरींत हरिहररावांना कारकून म्हणून पंचवीस रुपये दरमहाची नोकरी मिळाली !

म्हाळसाकाकू सुभद्रेला अडीअडचणीच्या वेळीं फार मदत करीत. सुभद्रेनें त्यांच्या हातभाराबद्दल संकोच दाखवला तर त्या म्हणत ‘ तुमच्या बहुमोल अहेराचा आम्ही अव्हेर केला, पण तुम्ही अपकाराच्या मोबदल्यांत उपकार पदरांत टाकलेत ! आम्हाला अन्नाला लावलेत. आम्ही गरीब माणसें तुमच्या अहेराची फेड कशी करणार ? रुपयाच्या ठिकाणीं पैहि देण्याचें आमचें सामर्थ्य नाहीं. तुम्हा थोरामोठ्यांची सेवा करावी हीच आमची थोडीफार फेड ! या अहेराचा आपण अव्हेर करू नका सुभद्राताई ! ’

सुभद्रा एवढेंच म्हणे ‘ काकू, तुम्ही एकाद्या माणसाची अवास्तव स्तुती फार करता. ’

तरी तिला अजून म्हाळसाकाकूंच्या या नेहमींच्या उद्गारावर समर्पक उत्तर सुचलें नव्हते.

## निढळींचा लेख ! :: : १०

आदल्याच दिवशीं कॉलेजांत एक व्याख्यान झालें होतें 'दैव कीं प्रयत्न ?' या विषयावर.

वक्त्यांनीं सांगितलें, दैववाद हा बावनकशीं वावदूकपणा आहे; दैवाचें अस्तित्वच नाहीं. दैव झूट आहे. यत्न म्हणजेच मनुष्याचा दुसरा प्राण.

तासभरच व्याख्यान झालें पण त्यावर विचार करायला मला सारी रात्र अपुरी पडली.

प्रात:काळीं मी तो विषय डोक्यांत घोळवीतच घरापुढील बागेंत आलों.

मुलें प्राजक्ताचीं फुलें गोळा करीत असलेलीं मी पाहिलीं. प्राजक्ताचा सडा पडला होता. फुलें वेंचतांना कांहींवर मुलांचे नकळत पाय पडत होते. सगळींच कांहीं त्यांना परडींत भरतां येणें शक्य नव्हतें.

मीं पायदळीं चुरगळलेल्या फुलांच्याकडे पाहिलें.

एका मुलीच्या प्राजक्तांनीं ओथंबलेल्या परडीकडे नजर दिली.......

हीं फुलें देवाला जाणार होतीं......

आणि त्यांच्याच सांप्रत दुर्दशा पोंचलेल्या सुकुमार भावंडांनीं, पदतळीं चुरमडलेल्या पुष्पांनीं काय पाप केलें होतें ?

नशीब ! दैव !!

इतक्यांत टप्‌कन कसलासा आवाज झाला. शेजारील सोनचांफ्याच्या झाडावरील फूल पडलें. साऱ्या मुलांचेंच लक्ष तिकडे वेधलें. सगळीं बालकें तो सोनचांफा घेण्यासाठीं धांवलीं.

मी हा देखावा नेत्रांत सांठवीत असतांच...

' अरे, आज मॅचमुळें कॉलेज सकाळचें आहे याची तुला दाद नाहीं वाटतें ? चल लौकर. पंधराच मिनिटांनीं घंटा होईल ' माझा मित्र केमकर, फाटकाचें दार उघडून आंत येत असतां, स्वतःच्या मनगटावरील घड्याळाकडे दृष्टि देत म्हणत होता.

' पण केमकर, कालचें व्याख्यान...प्रयत्न्‌ कीं नशीब ?...'

आपल्याच विचारतंद्रींत अद्याप मीं होतों. स्नेह्याच्या बोलण्याकडे माझें लक्ष नव्हतें.

' भलतेच काय डोक्यांत घेऊन बसतोस—अलीकडचीं व्याख्यानें अशींच. नवमतवादाचा शिक्कामोर्तब मारला कीं बस्, हवी तशी जीभ सैल सोडावी ! म्हणे देव नाही न् दैव नाहीं !! अरे, निढळींचा लेख कुणाला पुसतां आला आहे कां कधीं ? आमच्या गांवाला सुदाम नांवाचा एक पोरगा होता. वार लावून जेवीत असे. पुढें एक दिवस अकस्मात् कोठूनशी तार आली. त्याचा काका निपुत्रिक वारला होता. त्यानें मृत्युपत्र केलें होते. बेटा पन्नास हजारांचा धनी झाला ! फार लाम्ब कशाला !! माझा भाचाच यन्दा एम्. बी. बी. एस्. च्या शेवटच्या परीक्षेला बसतो आहे ना ! आतांपर्यंत पहिल्या व दुसऱ्या वर्गाशिवाय केव्हां परीक्षा दिली नाहीन्. तोंच आज तीन वर्षें एका क्लासांत रेंगाळतो आहे. पहिल्या वर्षी परीक्षेस जातांना वाटेंत अपघात झाला. गतसालीं विषमानेंच आजारी होता. चांगला अभ्यासू आहे पण दोन वर्षें फुकट गेल्यामुळें आतां बराच नाउमेद दिसतो. पास झाला तर डॉक्टर नाहींतर कम्पौंडर देखील नाहीं !!!

देवच श्रेष्ठ आहे! मनुष्याला तरी प्रयत्न करायची बुद्धी कोण देते? देवच कीं नाहीं?......'

केमकराचें उद्गार ऐकतां ऐकतां माझें नेत्र सहजच मुलांच्या दिशेस वळले. तों काय?

साऱ्यांचेच चेहरे करुणपूर्ण होतें. सर्वांच्या सोनचांफा मिळवण्याच्या अहमहमिकेमुळें त्यांच्यांत ओढाओढी झाली, सोनचांफा कुस्करून गेला. इतकेंच नव्हें तर......

सोनचांफ्याचें फूल पटकावण्याच्या धांदलीमधें त्यांचे आपल्या हातांतील परड्याकडे पूर्ण दुर्लक्ष होतें. अशा स्थितींत त्या हिंदकळल्या गेल्या. उपडया झाल्या. त्यांतील प्राजक्ताचीं फुलें पायदळीं तुडवलीं गेलीं......

आणि थोडयाच वेळापूर्वीं मी मनाशीं म्हणत होतों हीं प्राजक्त-पुष्पें देवाच्या शीर्षीं जाणार म्हणून!!!

## चोंचींत चोंच !                                    ११

शेताच्या बांधावरून जातांना दूर एका तालीवर सर्कल इन्स्पेक्टरांची लठ्ठ गुबगुबीत अशी ओळखीची आकृति कांहीं लोकांच्या घोळक्यांत उभी असलेली लक्ष्मीला दिसली. तिनें हंसरा चेहरा केला.

‘ काय ग लक्ष्मी ! कुठं निघालीस ? ’

सर्कल इन्स्पेक्टरनें मोकळेपणानें विचारलें.

‘ धुणं धुवायला ! विहिरीवर ! ’

‘ इतक्या उन्हाची ! ! ! ’

‘ याच वेळीं तिथं निवांतपणं धुवायला मिळतं. ’

‘ मी जेवायला येणार आहें ! ’

‘ आमच्याकडे का ? ’

‘ छे छे ! मागंच नाहीं का सांगितलं कीं तुझ्या घरीं आपण पहिल्यांदा यायचं ते बारशाचा पुरवाच झोडायला येणार. मी आतां जाणार तो तुझ्या बापाकडे ! ’

‘ नेहमींच जातां कीं ! बरं, आईला कळवलंत ? ’

‘ अंऽहं. ’

‘ मग कळवा ना कुणाच्या तरी हातीं ! का मी येऊं सांगून ? ’

‘ नको बाळ ! मी पाठवतों मनुष्य ! ! कसा काय चालला आहे राजाराणीचा संसार ? वामन गवंडी ठीक आहे ना ? ’

‘ तुमच्या कृपेनं ! ’

‘ कालच भेटला होता. अहो तलाठी ? ’ सर्कल इन्स्पेक्टर टाळी वाजवून गंमतीच्या स्वरांत म्हणाले, ‘ आपल्या ह्या चालू प्रकरणांत आमच्या लक्ष्मीची साक्ष काढा ! हें बघ लक्ष्मी, हा शिरप्या आहे ना, यानं शेजारच्या शेताची हद्द मागं रेटून नवी ताल घातली ! आपलं शेतं वाढवलं. ही ताल कुणी बांधली ? तुझा नवरा न् बाप असतीलच या बांधकामांत ?’

‘ हो ’ लक्ष्मी बोलून गेली. मात्र मागून शिरप्याचा क्रुद्ध चेहरा पाहतांच आपण कांहींच बोलायला नको होतें असें तिला वाटलें.

‘ पौडला वामन कामाला आहे त्याला मीं अगोदरच विचारलं; तोही असंच म्हणत होता. ’

सर्कल इन्स्पेक्टर बोलत होते. लक्ष्मी जायला निघाली तशी ते म्हणाले, ‘ जरा मौज केली हं लक्ष्मी ? मनाला लावून घेवूं नकोस ? या प्रकारांत तुला गोंवत नाहीं ! अन् काय ग ! तो वामन गवंडीन् तूं...तुम्हीं नवरा बायको पहिल्यासारखेच मुलखाचे लाजरे आहांत का ? ’

‘ इश्य ! मी भेटलें कीं तुम्ही सरळ बोलतच नाहीं. ’

लक्ष्मी विहिरीवर जातां जातां असें वरकरणी रागानें म्हणाली खरी, पण मनांतल्या मनांत तिला गुदगुल्या होत होत्या.

* * *

‘ अजून कसे आले नाहींत हे ? ’ लक्ष्मी राहून राहून म्हणत होती.

डोंगराच्या उतरणीला बसलेल्या दारवली गांवांत झोंपड्या पांच–पंचवीस एवढ्याच असतील ! त्या साऱ्या वस्तीमधून लक्ष्मी हिंडली.

नंतर खोपटाच्या परीघाबाहेर ती शक्य तेवढी लांब गेली; वामन सासऱ्याबरोबर नेहमी येत असलेल्या पांदीतल्या कांटेरी वाटेवर तिचा कडक पाहारा होता.

संध्याकाळ झाली होती. सूर्यबिंबानें समाधि घेतली होती. रविराजाच्या निश्चित ध्यानस्थपणाची कसोटी पाहण्याकरतांच कीं काय, काम संपवून बैलगाडी सज्ज करण्यासाठीं शिळवटाचे खिळे बैलाच्या मानेभोवतालच्या कातडी पट्ट्यांत खोचणारे शेतकरी, मोरवेलीची कांठी घेऊन गुरांमागें धांवणारीं मुलें, मळ्यांत लावणी–काढणी करणाऱ्या बाया यांच्या कर्कश आरोळ्या आकाशाला भेदून जात होत्या.

या आवाजाला लक्ष्मीच्या सूर्यानें जरी ओ दिली असती, तरी केवढें काम झालें असतें ?

आपल्या बापाबरोबर दररोज माघारी येणारा नवरा आज कां आला नाहीं ?

लक्ष्मीचा बाप तिला म्हणाला होता ' मी वामनला निघण्याचा खूप आग्रह केला ! तो, मी एकटा येईन असाच हट्ट घेऊन बसला. आज थोडासा तऱ्हेवाईकपणानं वागत होता ! दगडी भिंतही व्हावी तेवढी बांधून झालीं नाहीं ! हं लक्ष्मी, घाबरूं नको पोरी; येईल इतक्यांत ! '

लक्ष्मीचें हुरहुरतें काळीज बेचैन झालें.

दारवलीपासून दूरवर असलेल्या पौड या पेठ्याच्या गांवीं बांधकाम चालले होते. वामन रोज मावळतीला घरी परतायचा—

मग काटक्या कुटक्यांचें लक्ष्मीनें गोळा केलेलें सरपण व्यवस्थित मोडून तिजकडे त्यानें फेंकायचें.

लक्ष्मी आईबापांच्या जवळच, पण वेगळी राहत असे. तिची झोंपडी म्हणजे एक लहानशी ओबडधोबड खोली होती. आंत मनस्वी अंधार असल्यानें धुराच्या भयाने लक्ष्मी बहुधा बाहेरच्या ओसरीवजा जागेंतच तीन धोंड्यावर भाकरी अन् कोरड्यास करी.

या वेळीं ज्या गप्पा होत, त्यांमध्यें एक गोष्ट नक्की निघत असे.

वामननें म्हणावें, ' उगीच या खेड्यांत पडलोंय् आपण कुजत. चांगला पुण्याला मोटरलॉरीच्या ड्रायव्हरचा धंदा होता ! अन् लग्न झाल्या-

वर इथं पौडाशेजारीं पुण्यापासून दहा–अकरा कोसांवर मावळांतल्या खेडयांत काळ घालवतोय्!'

'त्या आयुष्यांत तरी काय आहे अपूर्वाई? माझ्या आईबापांची किती मदत होते आपल्या संसाराला! ही झोंपडीही निराळी बांधून दिली त्यांनीं.'

'हो, तुझ्या बापानंच मला गवंडीकाम शिकवलं आणखी एका उद्योगाला तरबेज केलं; पण खराब काम बुवा! नेहमीं चिखल, दगडधोंडे, यांच्याशीं गांठ!'

लक्ष्मी यावर म्हणायची, 'मोटर हाकण्यांत कुठलं सुख आहे! सारखी दगदग! आणि हलक्या मवाल्यांशीं संबंध आपल्याला सोसेल का? त्यांच्या अचकट विचकट बोलण्यानं तंटा झाला कीं करपून जाल तुम्ही या भाकरीसारखे! माझ्या बापाच्या आसऱ्याला आहां म्हणूनच! एवढं तेवढं बोललं तरी जिवाला खुपतं तुमच्या!'

'तूं जणूं तशी नाहींसच!'

'आहे ना! म्हणूनच माझ्या आईबापांच्या सहवासांत बरं चाललं आहे. शिवाय आई म्हणते तुम्ही दोघे एकएकटे राहिलांत तर बिनअनुभवाचे; सगळा भोकळसुती कारभार होईल; पैसे शिल्लक राहणें दूरच; कर्जच करून बसाल.'

वामनला कांहीं हा लक्ष्मीचा युक्तिवाद आंतून पटत नसे; आतां बायकोच्या प्रेमाखातर—त्याचें नुकतेंच लग्न झाल्यानें प्रणयाचा पहिलावहिला मोसम त्याच्या हृदयांत वावरत होता तेव्हां—लक्ष्मीचें म्हणणें त्याला लागलीच मान्य व्हायचें, ही गोष्ट निराळी!

लक्ष्मीचाहि वामनच्या ठिकाणीं अतोनात भाव होता. लग्न झाल्यापासून उशीरा येण्याचा हा प्रथमचाच प्रसंग.

तिचा जीव भारी खालींवर व्हायला लागला.

तिच्या मनांत नाहीं नाहीं त्या कल्पना तरंगून गेल्या. अन् त्यांतल्या एकीनें लक्ष्मीच्या अंतःकरणाचा कबज्या इतक्या चट्दिशीं घेतला कीं ती दुखऱ्या चित्तानें स्वतःशीच एकदम उद्गारली,

'अं! असं तर झालं नसेल?'

—गेले दोन दिवस वामन तिला वारंवार विचारीत होता, 'लक्ष्मी! कांहीं झालं कां? रोजच्यासारखी वागत नाहींस तूं!!'

खरेंच तसें घडत होतें; परंतु लक्ष्मीला बोलून दाखवायचा धीर होत नव्हता.

—त्या दिवशीं सर्कल इन्स्पेक्टरांचा निरोप घेऊन लक्ष्मी विहिरीवर एक तासभर खपली. सारे कपडे धुवून झाले.

तिथें शुकशुकाट होता. फक्त कपारींत एका पारव्याचे घुमणें काय तें पसरलेल्या शांततेचा भंग करीत होतें.

त्याच पारव्याची फडफड ऐकूं आली.

एक खडादेखील विहीरींत पडला. पारवा उडून गेला. खडा मारणाराचा थोडक्यांत नेम हुकला होता.

मागें वळून पाहतांच ही शिरप्याची कारवाई असल्याचें लक्ष्मीला उमगलें.

शिरप्या—

दारवलीचा गुंड! चोर! पक्का लफंगा माणूस!!

मघां सर्कलइन्स्पेक्टरांशीं आपण जे बोललो त्यामुळें आपल्यावर शिरप्याची जाळणारी नजर खिळली हें लक्ष्मीनें ओळखलें.

ती कावरीबावरी झाली. लक्ष्मीनें पदर घट्ट खोंवला व खांद्यावर धुण्याचें पिळे टाकून ती शिरप्याच्या पुढून वेगानें विहिरीच्या पायऱ्या चढली.

विहिरीजवळूनच लोकलबोर्डाच्या बैलगाड्या, मोटरी जाण्याचा रस्ता गेलेला होता. त्या रस्त्यानें कांहींजण चालले होते.

लक्ष्मीला माणसांत आल्यासारखे वाटलें. तिच्या उरांतली धडकी मात्र ओसरली नव्हती.

ती गांगरल्याप्रमाणें वागूं लागली.

तिच्या आईबापाकडे जेवणाखाणाला उतरलेल्या विनोदी सर्कल इन्स्पेक्टरांच्या थट्टेचेंही तिजकडून व्हावें तसें स्वागत झालें नाहीं.

—वामननें तिला बुजऱ्या वागणुकीचा खुलासा विचारला.

तिनें सांगून टाकायचे ठरवले देखील. पण तिच्या तोंडावाटे मजकूर मुळींच बाहेर पडला नाहीं.

'यामुळें तर नसेल ना वामन रागावला ? हो हो, खास हेंच कारण असणार !' लक्ष्मीला खात्रीनें वाटूं लागलें.

आणखीही एक नवऱ्याला सांगण्याजोगी गुप्त आनंददायक बातमी तिजपाशीं तयार होती; पण नुसत्या त्या गोड आठवणीनेंच लक्ष्मीची लाजून लाजून पुरेवाट होई. असलें लाजाळूचे फूल आपलें अंतरंग कसें उकलणार ?

काळोख दाटला तेव्हां लक्ष्मीला राहवेना. बापाला तिनें विनविलें, 'जा ना, घेऊन या शोधून त्यांना ! तुम्ही बघतांच ! नाहीं हो कधीं एवढा वेळ लावत ते !'

लक्ष्मीचा बाप म्हणाला, 'पौडांत भजन आहे. मी जातो भजनाला ! जांवयाचा शोध काढतों. आढळला तर धाडून देतों. नाहींतर घेऊन येतों.' —त्याला आणखीही कांहीं सांगावयाचे होतें; पण त्यानें स्वतःला आवरलें.

रात्रीचा एक वाजला. लक्ष्मीनें आईलाही सतावलें. ती माउली दिवसाच्या श्रमानें थकून झोपेंत गुंगत होती.

लक्ष्मी अस्वस्थ झाली. तिनें कंदील चेतवला व दारवलीच्या शेतांतून आजूबाजूला कुठें वामन दिसतो कां हें पाहण्याकरतां ती निघाली.

मध्यें तिला कुणाची तरी चाहूल लागली. तिनें कंदीलाची वात मोठी करून पाहिलें.

शिरप्या दिसतांच ती दचकली नि पुन्हा झपाट्यानें परत फिरली.

तिला वाटलें आज देव आपल्या चांगल्यावर नाहीं.

पण छे ! तसें नव्हतें ! ! एरवी वामन वाटेंत कसा भेटला असता ! !

'लक्ष्मी !' वामननेंच तिला हांक मारली.

'तुम्हालाच धुंडत होते. कुठं हो होतांत ?'

—उभयता घरीं गेलीं.

* * *

लक्ष्मीनें आईला नवरा आल्याचे सांगितलें. विचारीला क्षीणभार हलका झालासें वाटलें. तशा दमल्या भागल्या अवस्थेंतसुद्धां लेकीला भाकरी-झुणका करून द्यायला ती पुढें सरसावली.

'विशेष होतं का आज कांहीं ?' लक्ष्मीनें पुसलें.

बामननें नकारार्थी मान हालवली.

'भजनाला गेलां होतां?'

'सहज बसलों होतों पळभर! चैन पडेना!'

'कां?'

वामनला वाटलें सांगावें! पण त्याचा पराकाष्ठेचा लाजरा स्वभाव आड आला. त्याची जीभ उचलेना.

आपल्या प्रश्नांनीं वामनला त्रास होतोसें दिसतांच लक्ष्मीनें अवांतर गोष्टीच झोंप येईपर्यंत काढल्या.

दुसरा दिवस सुद्धां पुरतेपणीं लोटला नाहीं.

वामन आपल्या सासऱ्याबरोबर पौडात घराचें बांधकाम करीत असतां एका दारवलीकरानें सांगितलें.

'गांवांत पोलिस अंमलदार आला आहे. कुणाचीं खुरपीं काल रात्रीं चोरीला गेलीं म्हणें. तुमच्या लक्ष्मीवर वहीम आहे. रात्रीच्या सुमाराला ती बाहेर फिरत होती. तेव्हांच खुरपीं हरवलीं. पावलांचे ठसे घेतले. लक्ष्मीच्या पायाला ते जमतात...'

वामन व त्याचा सासरा तडक गांवीं आले.

पोलिस अधिकाऱ्याला त्यांनीं परोपरीनें सांगितलें; परंतु गांवमहाराची व शिरप्याची साक्ष!—

शिरप्यासमोर बोलण्याचे राहोच, पण त्याच्या डोळयाला डोळा देण्याचें धारिष्टही वामन दाखवीत नव्हता.

नवीन गुन्हा हुडकण्याचें श्रेय पोलिस जमादाराला मिळणार होतें. तो लक्ष्मीची जबानी हडसून खडसून घेत होता.

लक्ष्मी रडूं लागली.

तिला शिरप्याचा संशय आला. मागली हकीकत वामनला कळवावीसें तिला वाटलें. एकान्तांत देखील लक्ष्मीला हें धाडस झालें नव्हतें; मग अंवतींभंवतीं जमलेल्या तमासगिरांसमोर तें कसें होणार?

पोलिसांनीं तिला पकडून दीड कोस लांब असलेल्या पौडच्या ठाण्यावर नेलें. लक्ष्मीला सोडण्याची खटपट करण्यासाठीं तिचा बाप गेला.

लक्ष्मीची आई वामनला म्हणाली,

' पाव्हणे, तुमच्या कोंवळ्या मनाला हें वातावरण सहन नाहीं व्हायचें. चार दिवस पुण्याला जाऊन या हवे तर ! अन् नोकरीही बघा मोटर हांकण्याची ! तुम्ही नवरा–बायकोनीं या दारवलींत यापुढं राहूं नये हे उत्तम ! मात्र पुणें ते पौडची मोटरीची नोकरी लागली तर पाहा हं !' तेवढीच लेकीची खबरबात समजण्याची सोय होईल ! '

वामनला सासूचा सल्ला मानवला. एक बाब मात्र त्याच्या मनाला विलक्षण डांचत होती—

तो आपल्याशींच कळवळून कितींदा तरी म्हणाला, ' आपण लक्ष्मीला काल रात्र कां झाली हें सांगायला लाजलों. तिला भलता सलता संशय नाहीं ना यायचा ? छे ! काय लाज आपल्याला ! आतां नीटपणीं भेटूं दे ! सगळे सगळें सांगेन. '

याच विचारांत तो पुण्याला गेला. नशिबानें त्याला ड्रायव्हरचीही नोकरी मिळाली.

०००　　　०००　　　०००

मोटरलॉरी भरधांव पळतां पळतां एकाएकीं एंजिन बंद पडलें.

ड्रायव्हरनें पाहिले ! कांहीं विशेष बिघाड नव्हता ! इंजिनला पाणी हवें होतें ! !

त्यानें आजूबाजूला बघितलें; इच्छा नसतांना देखील पेट्रोलचा रिकामा डबा घेतला व एखाद्या माहितगाराप्रमाणें तो चालूं लागला.

विहिरीच्या पायऱ्यांपाशीं येतांच चमकून तो ओरडला !

' कोण, लक्ष्मी ! ! '

' आपण ! ! '

' लक्ष्मी, आजचा तिसराच दिवस ! सुटलीस तूं ! ! '

' लगेच ! त्या शिरप्याची गुंडगिरी पचली नाहीं. '

' शिरप्या ! त्याचा संबंध होता का यांत ? मग प्रथमच नाहीं...! ! '

' कांहीं कांऽहीं दडवून ठेवणार नाहीं मी आपल्यापासून ! ! '

विहिरीच्या खालच्या रुंद पायरीशीं आलेल्या वामनला मिठी मारीत लक्ष्मीनें सारी हकीगत सांगितली. शेवटीं ती म्हणाली, ' माझ्या बापाचा सर्कल इन्स्पेक्टरसाहेब एवढाच काय तो वशिला. तोच ऐन वेळीं उपयोगी आला.'

'ह्या शिरप्यानंच माझा पाणउतारा केला ' वामननेंही आपलें रहस्य सांगायला सुरवात केली, 'मी ज्या भागांत घर बांधण्याचें काम करीत होतों, तिथं माझ्या हाताखालीं चिखल वाहण्याला एक बाई होती. तिचं घमेलं उपडं झालं! ती घाबरली. मी तिच्या अंगावर माखलेला चिखल दूर करूं लागलों तो शिरप्या तिथं हजर! बेट्यानं माझी टिंगल केली! चार गडी माणसांदेखत मला खालीं पाहायला लावलं. नशीब माझं की, तुझा बाप जवळ नव्हता. मला तुला तोंड दाखवायची लाज वाटली. मी शरमेनं भटकत होतों. भजनाला गेलों तिथंही त्यानं माझा पिच्छा पुरवला.'

'हलकट मेला!' लक्ष्मीचा क्रोध अनावर झाला.

'तुझ्या बापाच्या कानावर गेलीच असेल ही बातमी? तो भल्या अंतःकरणाचा म्हणून गुपचीप राहिला.'

कसलीशी फडफड झाल्यानें वामन व लक्ष्मी भानावर आलीं.
त्यांना दिसले कीं समोरील विहिरीच्या कपारींत पारव्याचें जोडपें चोंचीत चोंच घालीत आहे.

लक्ष्मीला एकाएकीं लाजल्यागत झालें. तिला केवढ्या तरी मोठ्या छुप्या बातमीचा उकाला वामनपाशीं करायचा होता.

तो हलक्या आवाजांत केल्यावर वामन म्हणाला, 'तूं सांगितलंसच मघाशीं! आतां बारशालाच बोलावूं सर्कल इन्स्पेक्टरांना जेवायला!'

'अरे, हा ड्रायव्हर येतो तरी केव्हां!' या मोटरलॉरींतल्या आरडा-ओरडीनें वामनला त्याच्या कामाची आठवण झाली. पाणी भरलेला पेट्रोलचा डबा घाईघाईनें घेऊन जात तो उद्गारला,

'लक्ष्मी, मी हा आलोंच पौडाला उतारु पोंचवून पंधरावीस मिनिटांत. आपण पुण्याला बिऱ्हाड करूं...थांब, मोटर लांब जाईपर्यंत पायऱ्या चढून वर येऊं नकोस; उतारू चेष्टा करतील माझी.'

मोटरचा आवाज येईनासा झाल्यावर लक्ष्मी पाण्याचा हंडा घेऊन उल्हसित अंतःकरणानें निघाली.

तिच्या नजरेपुढूनच मघाशीं चोंचींत चोंच अडकवणारें पारव्याचें जोडपें पंख वल्हवीत जात होतें!

## स्वार्थत्यागाचा बाजारभाव : १२

चुन्याच्या घाणीचा दगड सावकाश फिरत होता. बैल घाणीभोंवतीं पिंगा घालीत होते.

तो बाजूला एका विटकरीवर बसला होता. त्याच्या खांद्यावर कातड्याचा आसूड लोंबत होता.

बाकी तिथें कुणीच नव्हतें.

आज एकादशी होती. पण याच्या अगोदरहि चार पांच दिवस त्याला कडकडीत उपवास पडले होते.

म्हणूनच रस्त्यानें एक बाई डोक्यावर फराळाचें ताट घेऊन चाललेली त्यानें बघितली तसे त्याला राहवेना. त्या बाईला त्यानें हांक मारली.

राजगिऱ्याच्या वड्या त्यानें विकत घ्यायच्या ठरवल्या.

परंतु पैसे होते कुठें जवळ?

'बाई, उधार देत असशील तर या राजगिऱ्याच्या वड्या मी विकत घेतो' तो म्हणाला.

'उधार! माझं हातावर पोट न् उधार मागतां!'

'पहा परवडत असेल तर! दोन दिवसांनीं पैसे मिळतील.'

'तुम्ही इथेंच कामाला असतां का?'

'ही जागा माझ्याच मालकीची आहे. हा पसारा मीच मांडला आहे. अनाथ विद्यार्थीगृह व्हायचें आहे या ठिकाणीं.

'म्हणतां काय! ही जागा तुमची! बांधकामाला मजूर नाहींत मग!!!' त्या बाईनें विचारलें.

'बाई मी स्वत:च मजूर झालों तिथें हाताखालीं कुठलें मजूर ठेवणार! हे पाहिलेत! ही चुन्याची घाणी सकाळपासून उन्हातान्हांत मीच चालवीत आहे. बाई, तुमची उधारी बुडायची नाहीं. पैसे नसलेच तर ह्या दगड विटा तुम्हामध्यें वाटून टाकीन.'

'बरें आहे, दोन दिवसांनीं येईन हं पैसे न्यायला!' ती बया निघून गेली.

त्यानें राजगिऱ्याच्या वड्या अधाशासारख्या खाल्ल्या.

तो आज थोडासा आनंदांत असावा. तिथेंच तो कपाळावर हात देऊन बसला होता.

इतक्यांत कामावरचे मजूर, बायाबापड्या मागचा थकलेला रोज वसूल करण्यासाठीं आले.

त्याचा नाइलाज होता. तो मुकाट्यानें मजुरांची कडक बोलणीं अखेर-पर्यंत सोशीत होता.

त्यानें खिशांतला लिफाफा काढला आणि तो वाचूं लागला.

त्या लिफाफ्यांतला मजकूर त्याला माहित असावा. कारण लिफाफा काढतां काढतांच त्याची मुद्रा हंसरी झाली होती.

  

पहिल्यापासून तो उदात्त विचाराचा होता. त्याची मनोरचना उच्च दर्जाची होती.

त्यानें हालाकष्टांत शिक्षणक्रम पार पाडला होता.

सोलापूर जिल्ह्यांत मोडलिंब गांवीं जी इंग्रजी शाळा आहे तेथें त्याचें शिक्षण चाललें होतें.

त्याला जवळचे नातेवाईक होते पण पैसे देऊन विद्याभ्यास चालविण्याइतका नातलगांना तो केव्हांहि जवळचा वाटला नाहीं.

रॉकेलचा डबा तो विकत घेई आणि किरकोळ बाटल्या बाटल्यानें तें तेल विकी. यांत जी कमाई होईल तिच्यावर तो जगत होता.

पहिला नंबर मिळवावा ही त्याची उमेद होती. कारण पहिल्या नंबरला फी माफ होती. पहिल्या नंबरला कांहीं रुपयांची शिष्यवृत्ति पण होती.

त्याच्या वर्गांत अवघीं आठ मुलें होतीं. झटून अभ्यास करून सुद्धां त्याचा कधीं पहिला नंबर आला नाहीं.

तो हुषार होता, अभ्यासू होता, मेहनती होता. मग असें कां व्हावें ?

त्याच्या वर्गांत पहिला नंबर ज्या मुलाला मिळत असे तो मुंबईच्या एका मोठ्या विमा कंपनीच्या डायरेक्टरसाहेबांचा एकुलता एक मुलगा होता.

मुंबईची हवा डायरेक्टरांच्या मुलाला मानवत नव्हती. म्हणून तो मोडलिंबसारख्या कुग्रामांत शिक्षण घेत होता. डायरेक्टरचा मुलगा बोर्डिंगांत राहात असे. डायरेक्टराच्या मुलाला कसलीहि कमतरता नसे. डायरेक्टराच्या चिरंजीवाला हेडमास्तरांची दरमहा वीस रुपयांची शिकवणी असे. डायरेक्टराच्या मुलाला सर्व विषयांत गुण भरपूर मिळत, पहिला क्रमांक मिळे.

त्यानें पुष्कळ अभ्यास केला. नेमलेल्या विषयांचीं अवान्तर पुस्तकें अतिशय खटपटीनें मिळवून वाचलीं. यानें तो ध्येयवादी बनला, त्याचें उदात्त विचार पोसले गेले हें सगळें कबूल! पण त्याचा पहिला नंबर कधीं आला नाहीं. त्याला शिष्यवृत्ति कधीं लाभली नाहीं.

प्रिलिमिनरींत त्याला डायरेक्टरच्या मुलाहून कमीच मार्क पडले. युनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत देखील असेच झाले.

त्याच्या कानावर कुजबूज आली, ‘ मोडलिंबची मुलें सोलापूर केंद्राला मॅट्रिकच्या परीक्षेसाठीं बसलीं होतीं. सोलापूर केंद्राचें पेपर्स मुंबईला तपासायला गेले होते, पुण्याला तपासायला गेले होते आणि ते ज्या कोणाकडे होते त्यांना डायरेक्टरचा मुलगा नोटांनीं भरलेल्या खिशानें भेटला होता.

अफवा उगाळीत बसण्याची त्याला संवय नव्हती. मोडलिंबच्या शाळें-मध्यें मॅट्रिकच्या परिक्षेंत सर्वांत जास्त मार्क मिळविल्याबद्दल डायरेक्टरच्या मुलाचा जो सन्मान झाला त्यांत त्यानेंहि भाग घेतला होता. डायरेक्ट-रच्या मुलाची त्यानेंसुद्धा मन:पूर्वक पाठ थोपटली होती.

तो कॉलेजांत गेला नाहीं. त्याचा स्वतःवरचा भरंवसा डळमळला होता. अविश्रांत श्रम करून देखील ज्याला शाळेमध्यें पहिला नंबर मिळ-वतां आला नाहीं त्यानें कॉलेजांत विद्यावेतनाचें जोरावर अभ्यासक्रम पार पाडणें अशक्य होय अशी त्याची ठाम कल्पना बनली. त्यानें नोकरी करायचें ठरवले.

यावेळीं त्याच्या अंतराळांत भिरभिरणाऱ्या ध्येयवादाला विशिष्ट आकार आलेला होता; कांहीं एक स्वरूप प्राप्त झालें होतें. गरीब, पोरक्या, निरा-श्रित मुलांसाठीं अनाथ विद्यार्थीगृह काढण्याचा त्यानें निर्धार केला. तिथे स्वावलंबनाचें तेजस्वी शिक्षण कसें द्यायचे याची रूपरेखा त्यानें आंखली. स्वतः गरीबीचीं दुःखें भोगलेली असल्यानें त्याच्या अनाथ विद्यार्थी गृहाच्या बाबतींतल्या कागदावर उतरलेल्या कल्पना बऱ्याच बिनचूक होत्या.

त्यांना मूर्त रूप देण्यासाठीं लागणारा पैसा तो नोकरी करून सांचव-णार होता.

पण कांहीं महिने तो बेकारच राहिला. हे दिवस त्यानें नातेवाईकांकडे काढले. प्रत्येकानें त्याचा कंटाळा करून त्याला निरोप दिला.

सुदैवानें एका तालुक्याच्या गांवीं त्याला शाळा शिक्षकाची नोकरी लागली. त्याला चाळीस रुपये मिळत असत. ‘अनाथ विद्यार्थीगृहा’ची कल्पना त्याच्या डोळ्यापुढून ढळली नव्हती. पोटाला चिमटा घेऊन तो पैसे सांचवीत होता.

ह्या गांवांतल्या एका वकिलांनीं त्याच्याशीं ओळख जमवली. त्याच्याशीं स्नेह राखला.

त्यानें आपले विचार वकिलांना बोलून दाखवले. वकिलांनीं त्याला भर दिली. शाळेंतल्या कांहीं व्यवसाय बंधू मास्तरांनींहि त्याला पाठिंबा दिला. व त्यांत हवे ते साहाय्य करण्याचें अभिवचन उच्चारलें.

वकिलांनीं हळूंच एक दिवस मुद्याची गोष्ट काढली. वकिली चालत नसल्याकारणानें त्यांनीं कुठल्याशा विमा कंपनीची एजन्सी घेतली होती.

वकिलांना तो जिवाभावाचा मित्र समजत होता; तेव्हां त्यांना मदत करण्याच्या हेतूनें त्यानें हजाराचा विमा भरला.

शिकवण्या करून, अत्यंत काटकसरीनें वागून तो पैसा साठवीत होता. हलके हलके दोन हजार रुपये जमले.

त्याला वाटले इतकी रक्कम पुरे. वकिलांनींहि त्याला म्हटलें एवढी रक्कम बस्स झाली. ज्यांना ज्यांना तो जिवाला जीव देणारे स्नेही मानत होता त्यांनीं त्यांनीं त्याला हेंच सांगितलें.

पण त्यानें शाळेच्या नोकरीचा राजिनामा पाठविला, त्यावेळीं वकिलांनींच त्याच्या रिकाम्या जागेसाठीं अर्ज केल्याचे त्यास कळले.

साऱ्या मित्रांनीं त्याला सोडलें.

त्यानें कंबर कसली. एक मध्यमसे शहर निवडले. हवापाणी, स्वस्ताई, रेल्वेस्टेशन...इत्यादि सगळी सोय पाहिली. अनाथ विद्यार्थी गृहासाठीं जागा पांचशें रुपयाला खरेदी केली.

' घर बांधून पहावें आणि लग्न करून पहावें ' या जुन्या मराठी म्हणीपैकीं प्रथमच्या अर्ध्या वाक्याचा त्याला लौकरच प्रत्यय आला.

कंत्राटदाराचा सल्ला फसवा ठरला. नुसत्या पायातच दीड हजार रुपये खलास झाले.

कार्यावरची त्याची निष्ठा जाज्वल्य होती. त्याला काम बंद ठेवायचे नव्हते. म्हणूनच तो नेटानें स्वतः चुन्याची घाणी चालवीत होता.

त्याच्या डोक्यांत विचार थैमान घालीत होते. थोडक्या वेळांतच त्यानें बैल थांबवले. आधींच चघळून ओली झालेलीं चिपाडे त्यांच्यापुढें सारली आणि खिशांतला लिफाफा काढून तो पुन्हां हसला.

विम्याचा हप्ता भरण्याची ती सूचना होती. तसें कांहीं त्याला करतां येणें शक्य नव्हते. पैसे बुडूं नयेत यासाठीं त्यानें खटपट केली तेव्हां त्याला समजलें कीं, मोडलिंबच्या शाळेतील डायरेक्टरचा मुलगा आतां त्याच विमा कंपनीचा डायरेक्टर झाला आहे.

आणि म्हणूनच आज तो किंचितसा खुषींत होता.

कामधाम आटोपून त्यानें मुंबईची वाट धरली.

विजेच्या पाळण्यांतून तो सहाव्या मजल्यावर आला. तो डायरेक्टर-समोर उभा राहिला.

त्यानें डायरेक्टरची जुनी मोडलिंबची ओळख काढली. आपल्या उदात्त कार्याचा पाढा त्याच्यापुढें गायिला. अखेरीला आपले विम्याचे साडेतीनशें रुपये परत करण्याची विनंति डायरेक्टरपाशीं त्यानें केली.

डायरेक्टरनें निर्विकार चेहऱ्यानें एक उत्तर दिलें. ' मला कायद्याच्या बाहेर जातां येत नाहीं. हप्ता योग्य वेळीं न आल्यास तुमचे पैसे बुडले असे नक्की समजा—'

' पण अनाथ विद्यार्थीगृहाचे सार्वजनिक काम आहे...आज वर्षांच्या वर्षें मी कष्टांत घालवून बेत कृतींत आणण्याचे प्रयास केले...! '

' मी तुम्हाला अनाथ विद्यार्थीगृह बांधण्यास मदत देऊं शकेन...!'

' खरेंच ! ' त्यानें हर्षभरित होऊन विचारलें.

' मात्र एका अटीवर '

' कोणची ती अट...? '

' माझें नांव अनाथ विद्यार्थीगृहाला द्या...'

तो सचिंत उभा राहिला.

' जा, इथें तिष्ठत राहूं नका...मला उद्योग आहेत. माझें म्हणणें पटत असले तर तसे मला कळवा...' डायरेटरानें त्याची बोळवण केली.

त्यानें अनाथ विद्यार्थी गृहासाठीं देणग्या मिळविण्याची शिकस्त केली. कांहीं श्रीमंतांनीं त्याला दहापांच रुपये देऊं केले व वर्तमानपत्रांत नांव छापा असें सांगितलें. बाकीच्यांनीं त्याची चेष्टा केली आणि हेंच लोक पैसे लावून पत्ते खेळण्यास, बिलियर्ड खेळण्यास रोज क्लबममध्यें जात असत.

त्याचा निरुपाय झाला. फिरून तो विमा कंपनीच्या डायरेक्टराकडे विजेच्या पाळण्यामधून गेला.

' अनाथ विद्यार्थीगृह तुम्ही बांधा, नांव तुमचे द्या...ते काम तुम्हीच हातीं घ्या...माझे ध्येय तुम्हींच तडीला न्या...गरीबांचीं मुलें उपयुक्त शिक्षण फुकट घेऊं द्यात. नमुनेदार शिक्षणसंस्था करा...'

असें म्हणत त्यानें डायरेक्टरच्या हवाली आपल्या योजनांचा, आयुष्यांतल्या आकांक्षाचा आराखडा दिला.

'ठीक आहे...मोडलिंबच्या शाळेंत मॅट्रिकमध्यें मी पहिला आलों त्यावेळीं माझा गौरव झाला, सगळीकडे माझें नांव छापून आलें. तेव्हांपासून मला प्रसिद्धीची हौस अतोनात आहे...महिन्याच्या आंतच 'अनाथ विद्यार्थी गृहां'वर माझ्या नांवाची पाटी पाहाल तुम्ही...' डायरेक्टर हंसतमुद्रेनें म्हणाला.

मजला उतरतांना विजेचा पाळणा वापरायची परवानगी नव्हती.

तो खिन्न मनानें जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागला.

'आजच्या समाजांत जनतेच्या कल्याणासाठीं अहोरात्र खपणाऱ्याला असे बक्षीस आहे...स्वार्थत्यागाला व कष्टाला ही किंमत आहे. हे दिव्य, अमोलिक गुण पैसा विकत घेऊं शकतो' तो दांत ओठ चावीत त्वेषानें म्हणाला.

आणि तेव्हांपासून त्याचा चालू समाजव्यवस्थेबद्दलचा विश्वास पार उडून गेला.

# छायानाथाचीं स्वप्नें ! : : : १३

'उठाव झेंडा क्रान्तीचा। उठाव झेंडा बंडाचा॥'

शेवटचें गीत संपलें. सभा आटोपली.

तरीपण छायानाथाच्या मनांतला वरील गीतानें निर्माण केलेला आवेश थंड झाला नव्हता.

याच्या अगोदरचें अनीलेचें भाषण व त्यांत उन्मादक झेंडागीताची भर! कडाडत कोसळणाऱ्या विजेला पृथ्वीच्या आकर्षणाची जोड मिळावी तसेंच घडलें.

ज्या अनीला या स्वयंसेविकेचें व्याख्यान छायानाथाला अतिशय रोमांचकारी वाटलें ती म्हणाली होती,

'ही सभा गंजीफ्रॉकच्या गिरणींत ज्यांनीं संप पुकारला त्या काम-

गारांनीं भरवलेली आहे. मजुरांचे रोज मालक कमी करतात; कां, तर देशी मालाला गिऱ्हाईक नाहीं म्हणून, पण हेंच मालक मालावर जो अवाच्या सवा कर बसलेला आहे तो उठविण्यासाठीं वरच्या वर्गाशीं कां झगडत नाहींत?......भांडवलशाहींत उगवलेली खेंगटी गरीब बिचाऱ्या सत्त्व-वाल्या मजुरांना छळून कशीं दबतील.........?'

हें बोलत असतां लांबवर उभ्या असलेल्या आपणांकडे अनीलेनें दोन-तीनदां पाहिल्याचेंहि छायानाथाला आठवलें.

सभेला आलेलें लोक हळू हळू झालेल्या कार्यक्रमावर चर्चा करीत व स्वतःची भलींबुरीं मतें देत घरीं परतत होते. छायानाथसुद्धां जायला निघाला असतां त्याला कुणीतरी विचारलें,

'छायानाथ! अगबाई!! आश्चर्य आहे! एक माणूस इथें कसें?...'

'माणूस आहे म्हणूनच' छायानाथ हंसून उद्गारला.

'म्हणजे! तुमची पूर्वींचीं मतें पार पालटली कीं काय?'

'कोण म्हणतें? विद्यार्थ्यांनीं राजकारणांत भाग घेऊं नये असें मला अजूनहि वाटतें ..'

'स्वतःचा पराभव तुम्ही थोडेच कबूल करणार! मग आतांपर्यंत मी कितीकदां बोलावलें तरी सभेला आलां नाहींत, नि आजच...'

'खरंच चुकलों! अनीला, तूं इतकी झकास बोलतेस हें जर माहीत असतें तर आपण तुझें एकहि व्याख्यान दवडलं नसतं बुवा! कॉलेजांत कां ग नाहीं तूं कधीं बोलत?'

'अहो, सगळ्यांत शेवटीं कॉलेजचं व्यासपीठ जिंकायचं असतं. अन् तिथें इथल्यासारखे मजूर, हमाल श्रोते नसतात कांहीं! तुमच्यासारखे हुषार विद्यार्थी भाषणार ऐकणार आमचें...काय बोलायचें त्यांच्यासमोर, सांगा...बरें, स्वारीला इकडे फिरकण्याचीं लहर कशी आली?'

'अनीला, या गंजीफ्रॉकच्या गिरणींत माझी आई लोंकरीचें स्वेटर विणायला आहे. पंचवीस रुपये पगार मिळतो तिला. पांच रुपये कापले आहेत तिचे.'

'हे कारखान्यांचे मालक मजुरांचे पगार अन् गळें नेहमींच कांपतात. तुमची आई आहे ना संपांत सामील?'

'नाहीं...या सभेंत काय ठरतें तें मी नुसतें बघायला आलों होतों.'

'दिसलें ना! चला तर आतां!'

'कुठें?'

'वाः वाः, छायानाथ, तुमच्या आईचें मन मला वळवलेंच पाहिजे. तिनें संपांत भागीदार व्हायला हवें...'

'अनीला, आम्हीं गरीब, आमच्या हातावरची धनरेषा कुठें दहा फूट खोल आहे? आईला चार पैसे मिळतात म्हणून सुखासमाधानानें पोटांत चार घांस ढकलतों आहोंत...दोन वर्षें हवीत अजून बी. ए. व्हायला...'

'मग राजकारणांत पडणार?'

'पडायसाठींच राजकारण असलें तर कोण त्या भानगडी करतो!' छायानाथ हंसत हंसत म्हणाला.

'पण तुमच्या आईला मी इतर ठिकाणीं...एखाद्या खादी संघांत नाहींतर सूत समितींत रोजगारी लावून देईन...'

'नको, आज नोकरी गेली तर उद्यांला अन्न भेटायची मुष्कील आहे आम्हांला...तुझे श्रीमंती बेत आमच्या जिवावर बेतायचे...'

'बरं! खूप दिवसांनीं आज निवांत गांठ पडली...गप्पा मारायला मिळाल्या. पुन्हां कधीं येणार अशी वेळ?' अनीला मनगटावरील घड्याळाकडे पहात म्हणाली.

'आतां मी निरोप घ्यायचा असेंच ना!'

'हो! दुसरीकडे सभा आहे! येतां?'

'कांहीं अभ्यास बिभ्यास आहे कीं नाहीं! अग अनीला, वार्षिक परीक्षेच्या आधीं पंधरवडाभर अभ्यास करून अभ्यासू मुलांच्या पहिल्या रेषेंत चमकणारे आपण बृहस्पति नाहीं! पहिल्या वर्गाची तयारी करायची तेव्हां जेमतेम पास व्हायचें असें सामान्यच विद्यार्थी...'

अनीलेनें एकदम हात जोडून हंसतमुखानें म्हटलें,

'जनाब, अभ्यासका प्रवचन बंद की जीये!'

'आठवड्यानेंच आपली सहामही परीक्षा आहे कीं!'

'सहामाहीच ना! ती तुमच्या सारख्या राजकारणाचें भय खाल्लेल्या विद्यार्थ्यांन् साठीं...'

'बापरे ! हे इंटरचें वर्ष अभ्यासाचें असतें...'

'आहे ठाऊक!'

अनीला घाईघाईनें जातांना छायानाथाला वेडावीत म्हणाली.

※ ※ ※ ※

राजकारणी धोरणांतलीं माणसें मोठी घावाडावानें वागणारीं असतात. अखेरीला छायानाथाच्या नकळत अनीलेनें त्याच्या आईचें मत संपाला अनुकूल करून घेतलें.

अवघ्या एकाच संभाषण प्रसंगांत आपल्या म्हणण्याचें एवढें तेज तिनें पाडलें कीं छायानाथाची आई जेव्हां घरीं आली तेव्हां लागलीच मुलाला म्हणाली, 'छायानाथ, मी नोकरी सोडली रे!'

'काय आई! म्हणतेस काय!!'

'खरंच! संप मिटस्तवर कामाला नाहीं मीं जाणार! माझ्या पगारवाढीसाठीं विशेष खटपट करणार आहे ती अनीला'

'अनीला? तिच्या छंदानें हें केलेंस तूं!!'

'हो'

'आई, ती घरची श्रीमंत आहे. माझ्याच वर्गांत आहे ती. तिला देखील मी सांगतों, इतक्यांत या उलाढालींत पडूं नकोस म्हणून! मला नोकरी लागेपर्यंत तरी आई तूं असें करायचें नव्हतेंस...'

छायानाथ आईला इतके कळवळून बोलला कीं तिला आपल्या कृतीचा पश्चाताप वाटला.

तो आणखी पुढें म्हणाला, 'माझी नू अनीलेची ओळख झाली तेव्हांपासून विद्यार्थ्यांनीं राजकारणांत भाग घ्यावा कीं नाहीं या बाबतींत आमचा मतभेद आहे. मी कॉलेजमध्यें विद्यार्थ्यांसाठीं विक्रीला माल ठेवतात त्या शाखेवर कामाला होतों. एक दिवस ही अनीला तिथें आली. हिला निबंधाची वही हवी होती. मी सहज विचारलें कसला निबंध लिहिणार. अनीला म्हणाली, 'विद्यार्थी व राजकारण'...त्याचवेळीं आमचा पहिला खटका उडाला...'

'तडफदार दिसते रे ती मुलगी!'

'होय! पण तिच्या उत्साहाला नू तडफेला भलतीं दिशा लागली असें

वाटतें मला. शिक्षण पुरतें झाल्याखेरीज, आपली मतें नीट पक्कीं बनल्याशिवाय हा उच्छृंखळपणा काय कामाचा...अनीलेचा न् माझा हळूं हळूं दाट परिचय झाला...गुप्त पोलीस त्यामुळें माझ्यामागें हिंडू लागले, मीं तिला टाळायला सुरवात केली. परवां पुष्कळ दिवसांनीं तुझ्या गंजीफ्रॉकच्या कारखान्यांतल्या संपवाल्यांचीं सभा होती तिथें एकमेकांशीं बोललो आम्हीं...समाजवादी विषयाचा प्रपंच त्या दिवशीं तिनें फक्कड केला... भाषण मात्र अनीला बेमालूम करते हं आई...'

'म्हणूनच मला बोलण्याच्या कवसालांत गुरफटलं...न् नोकरी सोडायला लावलं तिनं...किती मूर्खपणा केला मी...जिवाला रसायन लावून घेतलं...'

छायानाथाच्या आईची चाकरी सुटली. याचा परिणाम असा झाला कीं, छायानाथाला प्रिन्सिपॉलनीं मागची राहिलेली फी भरल्याशिवाय परीक्षेचा फॉर्म देण्याचें नाकारलें.

अनीलाच फक्त या प्रसंगीं त्याच्या उपयोगी पडली असती. पण...

संपामुळें नंतर दंगा झाला. एक पुढारी म्हणून तिला पकडण्यांत आलें व अनीलेला थोडीथोडकी नव्हे, चांगली अकरा महिन्यांची शिक्षा ठोठावण्यांत आली.

—गंजीफ्रॉकच्या गिरणीच्या मालकानें एकूण एक नवीन लोक कामाला ठेवले. संपवाल्यांच्या एकजुटीचा फायदा झाला नाहीं. छायानाथाच्या आईला लोकरीचे कपडे करून दुकानदारांना विकणें हाच एक व्यवसाय उरला.

परंतु यांवर निभण्याजोगें नव्हतें. छायानाथाला नोकरीसाठीं हिंडावें लागलें.

आणि यावेळीं व्यवहाराच्या एक एक विलक्षण अनुभवांतून छायानाथ अगदीं खारून निघाला.

सरकारी नोकरीकरतां एका ठिकाणीं तो मुलाखतीला गेला असतांना—

'तुमचे आवडीचे खेळ कोणते? तुमचा स्वाभाविक कल कुणीकडे आहे? तुम्ही रोज व्यायाम घेता कां? पितां काय? चहा का कॉफी का कोको! तुमची बायको कितवी शिकली आहे?...'

वगैरे प्रश्नानंतर सवाल आला,

‘ तुम्ही राजकारणांत भाग घेतां ?’

‘ नाहीं, ’ छायानाथानें उत्तर दिलें.

‘ ती कम्युनिस्ट अनीला तुरुंगांत गेली तिच्या हिंदी वर्गांत तुम्ही होतां ? ’

‘ छे: ’

‘ तिला पकडलें तेव्हां तुमच्या घराची झडती झाली होती ? ’

‘ अं हं ’

‘ आमचें सरकारी गुप्त पोलिस खातें सांगतें, तुमची न् अनीलेची मैत्री आहे. ’

‘ हो आहेच ! ’

‘ मग राजकारणाशीं तुमचा संबंध असला पाहिजे...’

‘ माझें जरा ऐकतां ! विद्यार्थ्यांनीं राजकारणांत पडूं नये असें माझें मत आहे...पण शिक्षण पुरे करायला पैसा...’

‘ जारे, दुसरा उमेदवार आंत पाठवून दे ’ साहेब छायानाथाच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां घंटा जोरजोरानें दाबीत बेपर्वाईत म्हणाला.

छायानाथाला आढळलें कीं बी. ए. एम्. ए. झालेल्या उमेदवारांची देखील आपल्यासारखीच या ना त्या कारणानें वासलात लागलेली आहे.

चाकरी नाहीं ! धंद्याला भांडवल नाहीं ! ! आहेत ते व्यापार धड चालत नाहीत अशी ओरड आहे...

अत्यंत खडतर स्थितींत छायानाथाचें कांहीं महिने गेले.

घरप्रपंचासाठीं अनेक ठिकाणहून त्यानें उधार माल आणला होता. वाण्याउदम्यांची नाहीं नाहीं तीं बोलणीं त्याला सोसावीं लागलीं.

छायानाथ पराकाष्ठेचा जिकिरीला आला.

राजकारणांत भाग न घेऊन सुद्धां पोटाचा पेंच कुठें सुटतो आहे ?

अपमान जिवा अजोक होत चालला. आईचा दुःखी कष्टी चेहरा छायानाथाला पाहावेना.

—तो एका बँकेत उमेदवार म्हणून फुकटावारी काम करीत होता.

——आशा दाखवून महिनेंच्या महिने बँकेचा मॅनेजर त्याला फुकट राबवून घेत होता.

कर्ज ! मानहानि ! !

आणिक एक विशेषच बातमी छायानाथाच्या कानावर पडली होती.

कुणीसा मुलगा आज सकाळीं छायानाथ एकटाच घरांत असता सांगून गेला,

'काकूंना आल्यावर म्हणावं उद्यांपासून सैंपाकाला या, शाळेची न् कचेरीचीं माणसें आहेत, जेवायचं लौकर झालं पाहिजे रोज, एवढा निरोप कळवा.'

बँकेंतले पैसे मोजीत असतांना छायानाथाच्या हृदयांत या निरोपांतला प्रत्येक शब्द सलत होता.

रस्त्यावर कॉंग्रेसची मिरवणूक चालली होती. छायानाथाच्या कानावर आरोळी पडली,

'क्रान्तीचा विजय असो'

  

'अय्या ! तुम्ही इथें ! !'

अनीलेला छायानाथास बघून केवढा हर्ष झाला !

छायानाथ कांहींच बोलला नाहीं.

कैद्यांना शिपायांनीं दूर नेलें.

पुन्हा भेट झाली तेव्हां अनीलेनें विचारलें—

'सांगा ना ! कुठें सत्याग्रह केलात ! मजुरांची संघटना घडवून आणलीत ! त्यांचे मजुरीचें दर वाढावेत, कामाचें तास कमी व्हावेत यासाठीं खटपट केलीत ! अजून बी. ए. व्हायचें होतें तुम्हाला ! त्याआधीं राजकारणांत पडलांत ! !'

छायानाथ मुग्ध राहिला व अनील अगदीं निकरावर आली तशी खेदानें म्हणाला,

'राजकारणांत पडून तुरुंगांत येण्याइतका मी भाग्यवान् कुठें आहे ?... बँकेत पैशाची अफरातफर केली...चोरीची शिक्षा भोगतों आहे मी ! !'

## डोंगरमाथ्यावरील रविबिंब ! : १४

'गोरख ए गोरख !' बैठकींत बसलेल्या मुरार विठ्ठलांनीं उग्र आवाजांत ललकारी मारली !

उत्तर येत नाहींसें दिसतांच जवळ बसलेला गुलालभाई मुरार विठ्ठल यांना म्हणाला,

'गेली असेल स्वारी त्या कयाधूकडे, नंदुरबारला !'

'छेः छेः !' मुलावरील आपला दाब घसरला असा गुलालभाईसारख्या दूर गांवच्या पाहुण्यांचा किंवा तेथें गोळा झालेल्या इतर नातगोताचा समज व्हावा हें मुरार विठ्ठलांना सोसलें नाहीं. ते पाहुण्यांच्या घोळक्यांतून उठून आंत गेले. स्वैंपाकघरांतून परततांना मध्यें असलेल्या गोरखाचा त्यांना धक्का लागला.

‘ काय करीत होतास ? मूर्खा, चल पाहूं बाहेर ’ असें म्हणत मुरार विठ्ठल गप्पाष्टकाच्या अड्ड्यांत बसले. गोरख दूर उभा राहिला.

आपल्या बरोबरीच्या गुलालभाईला चकाट्या पिटताना पाहून गोरखला इतका संताप आला, कीं त्याला अंतपार नव्हता !

‘ किंव् गोरखभाय्, ठीक छे ? तें खिशांतून काय डोकावतंय्, वर्तमान पत्र ? ’ गुलाल बोलत होता.

गुलालच्या म्हणण्यांतील भाव तो ज्या पाटीदार समाजांतला होता, त्याच्या विचारसरणीला धरूनच होता. पाटीदार स्वतः वर्तमानपत्रें वाचत नसत हें एक, व इतरांनींही तीं वाचलेलीं त्यांना आवडत नसत हें दुसरें.

‘ हें कॉलेज का काय, त्यामध्यें जाऊं लागल्यापासून अगदींच विकळला आहे. गोरख, आधीं मघाच्या प्रश्नाचं उत्तर दे ! कुठं होतास ? ’

‘ आंत जेवत होतों. ’

‘ अजून अवकाश आहे तासभर. ’

‘ हो, पण आपल्याबरोबर मी पाट घेऊन जेवायला बसणार, तें आईला खपत नाहीं. तुमचा मान राहणार नाहीं म्हणें; स्वैपाकघरांत कोण ती घाण ! अस्वच्छता, शितं, खरकटं अंगाला लकटूं नये म्हणून पाटावर बसतात जेवणाला. ’

‘ हं ! झाला उपदेश सुरू ! बापाला उपदेश ! आम्ही पूर्वीं बापाच्या समोर उभे देखील राहात नव्हतो. हीं पोरटीं थोरामोठ्यांचा अपमान करायला शिकलेली ! हीं पढीक माणसंच रानटी आहेत ! मघां मला केवढ्या जोरानं धडक मारलीस ! ’

‘ मी जाणून बुजून का तसं केलं ? काय या पाटीदारांचीं घरं ! अकरा हजार रुपये खर्च झालें म्हणें हें घर बांधायला. जागा चांगली ऐसपैस, लांबरुंद; पण अंधारगुडुप; स्वैंपाकघर वगळलं, तर तीन मजल्यांत एक प्रथक् निजायची खोली आढळेल तर शपथ ! उगीच नाहीं पश्चिम खानदेशांतल्या या मुलखाला मागासलेला प्रांत असा शिक्का. ’

‘ गोरखभाई, एवढ्या अंधारांत वर्तमानपत्रांतलं बारीक अक्षर तेवढं दिसतं ! ’ गुलाल म्हणत होता.

' ह्या—ह्या वाचण्यानंच सारा घात केला. कशाला त्या शामभाईच्या शाळेंत घातला?'

' अन् त्याची मुलगी कयाधू! अहो मुरार विठ्ठल, ती बरीक गोरखच्या लक्षानं वागते हं.'

गुलालभाईच्या साळसूद बोलण्यांतल्या फटी गोरखला स्पष्ट ओळखूं येत नव्हत्या असें नाहीं.

' आण तें वर्तमानपत्र इकडे; जाळून टाकतों! बरं झालं या पोरट्यानं गुण उधळले तशी बऱ्याच गांवकऱ्यांनीं शाळेंतलीं मुलं काढली ते... गोरख, मीं तेरा पेले चहा सांगितला आहे तो घेऊन ये. या पाहुण्यांच्या घोड्यांना तोबरा दे.'

गोरख तेथून हालला नाहीं.

' पोरावरची पकड अगदींच निसटली. साऱ्या गांवांत छीः थूः व्हायची वेळ आली,—आली कसली—झालीच आहे! असा उंडारला आहे कार्टा—'

मुरारविठ्ठल गोरखच्या खादीच्या खिशांतील वर्तमानपत्र घेण्यास सरसावले.

' थांबा, मी जीव कदरून सांगतों, कीं या पाहुण्यारावळ्यांना चहा आणणार नाहीं. दहा माणसांच्या बरोबरीनं लागते या एकेका घोड्याला हबकायला! किती पाटीदारांचे हीनपणें...शेतावर कामाला जायला नको... ती खंडानें द्यायचीं, सरासरीनं प्रत्येकाचीं शेतं चाळीस—पंचेचाळीस बिघ्यांच्या वर आहेत. पण कंबर बांधून कामाला उठायचं हें यांच्या रक्तांतच नाहीं! रात्रंदिवस निखाऱ्यावर चहाचं आधण–पाणी! पही पाहुणें–लाडू–बासुंदी–बकाणायची! यांच्या हजामतीसाठीं चार–दोन न्हावी–पाळलेले!—'

मुरारविठ्ठलांची मिजास थंडी पडली. ते चार-दोन पावलें मागें सरून उभे राहिले. परंतु सारी शक्ति एकवटून गुलालभाईला ते म्हणाले,

' गुलाल, अमावास्या कांहीं लांब नाहीं. त्याच्या अगोदर तुम्ही सुचवायला आलां अहांत त्या मुलीशीं गोरखचं लग्न ठोकूं. हा शिकून पैसे मिळवील त्यावर आमचा ताबा राहावा यासाठीं याचं दुसरं लग्न केलंच

पाहिजे. याला लिहायाला वाचायला मोकळीक ठेवली त्याचा वचपा निघतोय्. याच्यावरचे पांचजण भाऊ टाकले काढून मीं शाळेंतून, ए गोरख, दे तें वर्तमानपत्र इकडे...'

'येत असला तर वाचा त्यांतला मजकूर! माझ्या पहिल्या बायकोची नोटिस...पोटगी द्या, नांदवा, नाहीं तर दुसरं लग्न करणार आहे ती—'

'खुशाल तडफडूं दे! बायकांना तोटा नाहीं. त्या आंधळ्या मुलालाही बायको मिळाली. हो ना गुलाल?'

'पण मला पुन्हां लग्न करायचं नाहीं. माझी ही बायको नांवाचीच होती म्हणा. इथं बहिणींनीं, आईनीं तिला कष्टाला जुंपलं, तुम्ही तिच्या बापाशीं भांडलां. कांहीं समजत नव्हतं अशा कोवळ्या वयांत तिला घालवून दिलीत! बाकी तुम्हाला बायकांची काय किंमत! पैशासाठीं बायको गहाण ठेवण्याचंहि उदाहरण घडलं आहे पाटीदार समाजांत...!'

आतां मुरार विठ्ठल चिडून गोरखला मारायला धांवले, पण आजूबाजूच्यांनीं म्हाताऱ्याला आवरलें.

—आणि तितक्यांत तेरा कप चहाही आला.

§ § § §

लहानपणापासून गोरखच्या मनामध्यें घरांतल्या वडील माणसासंबंधीं जो वांकुडभाव उपजत चालला होता, तो थोडातरी पुसून जाईल अशी एकसुद्धां गोष्ट झाली नाहीं.

गोरखच्या पिंडांतच शिकण्याची आवड होती कीं काय कोण जाणें! भावांच्या संगतीनें शेतावर गेला तरी तो झाडावर, शेतजमिनीवर रेघोट्या ओढी आणि यांतच त्याची लिहिण्यापुसण्याची उत्कंठा उसळून वर आलेली दिसत होती.

गांवोगांवीं शाळा उघडण्याची खटपट त्या वेळीं सुरू होती. नंदुरबारचे शामभाई पाटील यांनीं या कामीं पुढाकार घेतला होता. त्यांनीं पाटीदारांची एकंदर स्थिति सुधारण्याचा चंग करकचला होता. पश्चिम खानदेशांतील लहानमोठ्या परगण्यांतर्फे ते कार्य करीत. पाटीदारांची अवस्था ऊर्जित व्हावी यासाठीं शामभाईचा अतोनात प्रचार चालला होता.

बाकीच्या पाटीदारांप्रमाणें आपल्या मुलीचा लौकर विवाह उरकायचा नाहीं असें शामभाईनीं ठरवलें. पाटीदारांमध्यें दोन वर्षें उमरीचीं मुलें झालीं, कीं त्यांचे वाङ्‌निश्चय होतात. आणखी आठ वर्षांच्या आंत नवरा नवरीची लग्नगांठ आंवळतात; शिवाय मूल जन्मलें, कीं सहाव्या दिवशीं छट्टी, मग बाठ...असल्या करमणुकीच्या उत्सवांत पैसे फन्ना करायचे, बायकांच्या अंगांवर सोन्यामध्यें गांठवलेले हरप्रकारचे मणि, चांदी, रुपे, पितळ या धातूंचे दागिने घालायचे...या साऱ्या रकमेची उधळवावडी करणाऱ्या चालीरींतींना शामभाईनीं फांटा दिला होता.

रूढिप्रिय पाटीदारांनीं शामभाईना लाख शिव्या मोजून त्यांना वाळींत टाकल्यासारखें जरी केलें होतें, तरी शामभाईच्या यत्नांत कसलीच कोताई दिसून येत नव्हती.

गोरखच्या गांवीं शामभाईनीं शाळा काढली. गोरख हट्ट करून शामभाईच्या हाताखालीं दाखल झाला. पहिल्यानें सातवीपर्यंतचे वर्ग होते. अडीच हजार वस्तीचा गांव, पण पाटीदार समाज शिकण्याला पद्धतशीर विरोध करीत असल्यानें तिसरीपर्यंतच वर्ग कायम राहिले !

स्वतः शामभाई शिकवीत. शाळेच्या या नव्या घडामोडीचें मुरार विठ्ठलांना महत्त्व वाटलें नाहीं. ते वेळीं अवेळीं वर्गांत येऊन म्हणत,

‘ मास्तर, पोरग्याला घरीं पाठवा; शेतावर भाऊ देखरेख राखतोय्. त्याला भाकर पाठवायची ’

दुसऱ्या कांहीं खेडेगांवांत शाळा होत्या. तेथील गुरुजींना पाटीदार समाजांतील खेडवळ पालकांकडून भाजीपाला व शेतांतील बागांमधील फळफळावळ कायम मिळत. तेव्हां ते मुलांना जाऊं देत. शामभाईंची मात्र मुलांवर सक्त नजर असे.

ते मुलाच्या बापांला उलट म्हणत,

‘ तुम्हीं कां नाहीं जात शेतावर ? मळ्याला जायचा एक दिवस जरी मालकानें चुकवला, तरी निदानपक्षीं शेरभर धान्य गळबटतें म्हणतात. ’

मुरारविठ्ठलांना हें कुठचें पटायला ? शामभाईसारखीं माणसें अतिशहाणपणाचा उपसर्ग मांडतात असेंच त्यांना वाटे.

गोरख शामभाईच्या सहवासांत चांगलाच रमला होता. परक्या प्रांताहून आपले जिल्हे किती अडाणीपणांत आहेत हें गोरख, कयाधू वगैरे साऱ्या मुलांच्या मनावर शामभाई वारंवार ठसवीत.

भिल्लामध्यें परसाकडे जातांना पाण्याची लोटी घेऊन न जाण्याची एक घाणेरडी संवय होती. तसेंच जिवंत निरुपद्रवी जनावरें मारून त्यांचें मांस खायचें, मदिरापान, या चालींचा नायनाट करण्यास बारा-तेरा वर्षांच्या गोरखनें शामभाईना बराच हातभार लावला. गोरखनें आपल्या मळ्यांत मोलमजुरी करणाऱ्या भिल्लांवर पगडा बसवला.

मुरारविठ्ठलांनीं गोरखची ही वागणूक अमर्याद मानली. नंदुरबारला गोरख इंग्रजी शिकायला गेला तेव्हां त्याला कसून विरोध झाला.

नंदुरबारला कयाधू गोरखला म्हणाली,

' गोरख, भाईचा एक निरोप आहे. '

' कोणता ? '

' भाई तुझ्या गांवची शाळा दुसऱ्याच्या हवालीं देऊन वेगळ्या चळवळींत पडणार. त्यांनीं शक्य तेवढ्या पाटीदारांचीं मुलें आपल्याकडे वळवायला सांगितलीं आहेत ! '

कयाधूचें हें बोलणें लक्षांत ठेवूनच गोरखनें त्याच्या वर्गांतल्या गुलालशीं आपुलकी ठेवली.

शामभाईकडे गुलालची वग सुरू झाली.

त्याची न् कयाधूची गट्टी बनत चालली. पहिल्या सपाट्यांतच तो तिला म्हणाला,

' मला पाटीदारांचीं लौकर लग्न करण्याची रीत थेट नापसंत आहे. शामभाई म्हणतात तें माझ्या आधींच ध्यानांत आलें. मीं साफ नाकारलं बाशिंग बांधायचं. '

पाटीदारामध्यें दरेक माणसाचें आडनांव पाटील हेंच. तथापि वतनदारी असणारे जे पाटील होते, त्यांपैकीं गुलाल हा एकजण होता. त्याचा गांव शंभर–दीडशें घरांचा होता.

हे आटोपशीर खेडें नमुनेदार करायचें, तेथल्या लोकांची अडून बसलेली प्रगति खुंटूं द्यायचीं नाहीं असे उच्च विचार गुलालनें बोलून

दाखवले, तशी शामभाई, कयाधू व गोरख या तिघांना अतिशय आनंद झाला.

इंग्रजी सहावीमध्यें गुलालनें बरेच गचके खाल्ले व कयाधू घरीं अभ्यास करून परीक्षेला बसत बसत सरतेशेवटीं मॅट्रिक झाली, या घटनेचें कोणालाच कांहीं वाटलें नाहीं.

कयाधू विशेष गोरी नव्हती. परंतु कोणीही तरुणानें तिच्याकडे बघितल्यावर त्याच्या जिवाची उलथापालथ होईल इतकी तिची अंगलट प्रमाणशीर व नीटस होती.

आपल्यावर कयाधू खूष आहे असें गुलालभाई निभ्रांतपणें समजत होता.

आतां शिक्षण आटोपण्याचा बेत करून गुलालनें विचारलें,

'कयाधू, तूं माझी जोडीदारीण होशील का ?'

'माझं ठरलं नाहीं कांहींच !'

'कधीं नक्की होणार ?'

'गोरखचा सल्ला घेऊन सांगेन !'

'त्याचा काय संबंध ?'

'वा: त्याचं लग्न झालेलं आहे न् मी विचारलें तर तो वावगी मसलत बोलायचा नाहीं.'

'पण तो पुण्याला शेतकी कॉलेजांत—लांब...'

'येईल कीं सुट्टींत. त्याचा विचार घेणं परम अवश्य आहे.'

अन् कयाधूनें जेव्हां गोरखशीं हा विषय काढला, तेव्हां तो बरेंही बोलला नाहीं न् वाईटही म्हणाला नाहीं. कारण सुटीच्या दिवसांत पाटीदार समाजाच्या थरांतून प्रवास करीत असतां त्याला गुलालची बित्तंबातमी कळली होती. गुलालला सवंगड्यासह हॉटेलांत भजी चरताना गोरखनें पाहिलें होतें; पत्त्यांचा जुगार खेळताना त्यानें पाहिलें होतें. केवळ कयाधूची हांव धरुनच नंदुरबारला गुलाल राहिला असावा असें निर्धोकपणें समजण्याइतपत स्थिति होती.

गुलाल खळ्यावरचें धान्य वडलांना नकळत मारवाड्यांना नेऊन विकी. आईपाशीं व बहिणीजवळ तो पैसे मागे.

त्याच्या प्रकृतींतील कापट्य गोरखला एका प्रसंगानें पुरतें माहीत झालें.

गोरख राहात होता त्याजवळच्या गांवांत चार वर्षांच्या आंधळ्या मुलाचें लग्न होतें. त्याच्याच वयाच्या मुलीच्या बापानें सातशें रुपये हुंड्यासाठीं कसाब होऊन पोरगी विक्रीला काढली होती!

मुरारविठ्ठलांनीं गोरखला लग्नाला जाण्याचा हुकूम केला.

शामभाईची व त्याच्या शिष्यांची अशी प्रतिज्ञाच होती, कीं, ज्या विवाहांत वराचें वय अठराहून अधिक व वधू कमीत कमी चौदा वर्षांची नसेल, त्या समारंभाला जायचेंच नाहीं.

त्यांत हा तर आंधळ्या मुलाचा लग्नप्रसंग!

गोरखनें आपल्या फर्मानाची तमा ठेविली नाहीं याचा मुरार विठ्ठलांनीं लग्नाला जमलेल्या मंडळीसमक्ष गर्गशा केला. तेथें हजर असलेल्या गुलालभाईचें व मुरार विठ्ठलाचें मेतकूट जमले.

या लग्नाला गुलालभाई गेला हें कयाधूला कळलें, तेव्हां तिच्या मनांतून गुलाल बराच उतरला.

परंतु याबद्दल विचारतां गुलाल म्हणाला,

'आपल्यामध्यें समारंभाच्या पंगती रस्त्यावर जेवायला बसतात. थोडी धूळ उडाली असा भास झाला, तरी सारें अन्न फेंकून देतात. रिकाम्या डामडौलानं आपली आहाराची टंचाई वाढते आहे. पाटीदारांतला हा माजोरीपणा नाहींसा करावा असं शामभाईच नाहीं म्हणत नेहमीं?'

—नुसतें भिकाऱ्याटाकाऱ्यावारी पाटीदारांचे दरसाल तीन–चार मापें धान्यधुन्य निकालात निघतें. एक माप म्हणजे आपल्या इकडच्या शहाण्णव पायली. अष्टौप्रहर लोळायला मऊ–मऊ गाद्या–गिरद्या, पोषाखाची छानछोकी! मळ्यांतल्या कापसाच्या बोंडाचें कधीं दर्शनही घ्यायचें नाहीं.'

'पाटीदार समाजा, तूं ही अवस्था ओलांड' असा जप घेत सुटीच्या दिवसांत फिरणाऱ्या गोरखची हकीकत मग कयाधूनें सांगितली. लगेच गुलाल म्हणाला,

'गोरख समाजांत वावरतो ते चालते! मी अंध मुलाच्या लग्नाला वेगळ्या हेतूनं गेलो तरी माझ्यावरच रागावतेस तूं कयाधू?'

कयाधूचें मन ढेपाळलें. शामभाईनींही मिळतें घेतलें. कारण पाटीदारांत प्रचार करायला माणसांची वाण होती. कोणी अंगुळभर जरी कार्य

केलें, तरीं त्याचें अगत्य धरून अशा पाटीदार तरुणाची पाठ थोपटणें जरूर होतें.

सर्व पाटीदार समाजांत कमालीची अनीति माजली होती. होतकरू मुलें तेरा-चौदाव्या वर्षीच पाचकळ विषयांवर अवाच्यासवा चर्चा करीत. दिवसभर झोंप—घराच्या आसपासच्या मारवाड्याच्या दुकानीं गप्पा झोंकीत तासन्तास घालवायचे–कुणाची बायको जास्त रूपवान दिसते, तिला कुठं गांठायची, ही चर्चा त्यांच्यांत चालायची—हे नखरे मोडायला पुरेसें बळ हवें होतें.

एकदां शामभाई, कयाधू व आणखी एक गुजराती म्हातारवयाची विधवा ही नंदुरबार तालुक्यांत मोटरीनें हिंडत होतीं. शामभाई पश्चिम खानदेशांतील मागसलेल्या मुलुखाच्या वतीनें मुंबई कायदेमंडळात निवडले गेले होते व तेव्हांपासून मंत्रिमंडळांतील आणि बाकीची कार्यकर्ती माणसें इकडे आणून त्यांना पाटीदारांची दुःस्थिति दाखवण्याचा शामभाईंनीं क्रमच आंखला होता.

या बड्या गुजराती बाई, कयाधू, अणि शामभाई रात्रीं मोटरींतून चालली असतां आसपास गलबला ऐकूं येऊं लागला.

'काय आहे हो हें!' गुजराती बाईनें विचारलें.

'असेल चैनबाजीचा एखादा प्रयोग' कयाधू म्हणाली.

'या अळसटांना दुसरा उद्योग असेल तर ना! कुटाळक्या बडवायच्या, लोखंडी धांवाच्या घोड्याच्या गाड्यांमधून नाच तमाशाला जायचं...' शामभाई तिरस्कारानें बोलत होते.

'चला, बघूं तरी!' गुजराती बाईनें फार नेट धरला; तेव्हां तिघेजण गेलीं. नायकिणीचा पायरव त्यांच्या कानांत शिरत होता.

'अरे, हा गुलालभाई मिटक्या मारींत आसनमांडीं ठोकून आहेच इथं!...' शामभाईंना आश्चर्य वाटलें!

'कुठं! कुठं!!' कयाधूनें बघितले व ती हंसून उद्गारली,

'फिरून भेटला कीं गुलाल म्हणेल असे नाच बंद व्हावेत याची खटपट करायला गेलों होतों.'

गुजराती बाई म्हणाली.

‘ सोन्यासारखी शेतीवाडीं आहे, कापसाचं दांडगं उत्पन्न आहे, हो ना शामभााई ? काय ही पाटीदारांची राहणी ! शामभाई, इथं सातपुड्याच्या कडेला अरण्यं आहेत लागवड होण्यासारखीं ? ’

‘ हो ’ शामभाई म्हणाले,

‘ पहा कुणी तसलीं शेतें करून पाटीदार समाजाची नवीन वसाहत करीत असेल तर...मी देइन देणगी...! ’

—पावसाळ्यांत विधिमंडळाच्या बैठकी पुण्याला भरत. शामभाईचा मुक्काम गोरखकडेच असे. शामभाईनीं त्या वेळी गोरखपुढें घडलेला इतिहास मांडला.

मध्यंतरी शामभाई कुणाला भेटायला गेले असतां कयाधू म्हणाली,

‘ गोरख, तुम्हांला गुलाल काय वसुलाचा माणूस आहे माहित नाहीं ! ’

‘ कयाधू, त्या गुलालचीं एक सोडून तीन लग्नकार्यें झालेली आहेत; जाऊं दे तो विषय; आज जरा निवान्तपण आहे; नाहींतर कॉलेजमधें अभ्यासाखाली जीव कोळदंड्याला येतो अगदीं. बाकी मनाचे श्रम विसरायला हें बरें साधन आहे. मधून मधून शामभाई पुण्याकडे फेरी टाकतात, त्यामुळं आपल्याकडचीं माणसं तरी भेटतात. या शेतकी-कॉलेजांत सगळे सिंध, निजाम-हैद्राबाद, कर्नाटक इकडचे लोक येतात, गडगंज शेती असून आपल्याकडच्यांना शिकायची बुद्धि होत नाहीं. ’

‘ वेळ पडली तर पांच-पांच सहा-सहा, लग्नें करून देतात ना आईबाप-प्रेमविवाह करा म्हटलं कीं ही भिल्लासारखीं जंगली लोकांची लग्नं आहेत अशी पाटीदार हेळणा करतात...’

‘ कयाधू, मी प्रीतिविवाह करूनच दाखवला असता; पण एक जूं आहे ना मानेवर ? नवरा-बायकोची गांठ सुद्धां नाहीं. विवाह का थट्टा ती ? ’

हेंच गोरखचे शब्द कयाधूच्या अंतःकरणांत कोरले गेले.

सुटींत गोरख घरी गेला असतां त्याच्या बायकोची नोटीस कयाधूच्या वाचनांत आली. तिनें तावडतोब तो अंक गोरखच्या हातांत पडेल अशी व्यवस्था केली.

—यानंतर वडील व गोरख यांची खडाजंगी !

—आणि गोरखनें तोडलेले घरचे पाश.

*　　*　　*

बी. एजी. ची परीक्षा उत्तम रीतीनें उलगडल्याचा आनंद गोरखला मुळींच अनुभवायला सांपडला नाहीं, इतका तो गोंधळलेल्या मनःस्थितींत होता.

अखेरीला पुढें हालचाल कोणत्या दिशेनें करायची हें निश्चित झालें. गोरख व कयाधू यांचे जन्माचें संबंध गुंफले गेले.

सरकारमार्फतीनें ठराविक मुदतींत रान तोडून तेथें शेतें बनवण्यास गोरखनें मोफत जागा मिळविली.

शामभाईच्या साहाय्यानें गुजराती विधवा बाईनीं दिलेल्या जिंदगीचा गोरखला अत्यंत उपयोग झाला.

आजूबाजूला पिकांनीं दाटलेली व रमणीय वावरें असणारा ' पाटीलपुरा ' हा आदर्शवत गांव, हवेशीर, टुमदार, खुलास उजेडाचीं घरें बांधून उभा झाला.

ह्यांत वर्षेंच्या वर्षें गेलीं. मुरार विठ्ठल गोरखला शिव्या देता देतांच वारले. त्यांच्या उत्तरक्रियेला आठशें रुपये खर्च झाला.

—गुलालभाई, गोरखची आपसांत भांडलेलीं भावंडें ही त्याला बरे म्हणत नाहींत.

पण शामभाई बाहेरचे जे जे लोक ' पाटीलपुरा ' बघायला आणतात ते ते गोरखला सुंदर पोल्ट्रीफाम, जिथल्या तेथें शेती केल्याबद्दल व पाटीदारांतील कांहींजण सुधारले म्हणून धन्यवाद देतात.

गोरख उत्तराखल एवढेंच म्हणतों,

' शामभाईच्या शिकवणुकीनें मी थोडेंबहुत काम करतों. कयाधूही स्त्रियांमध्यें शिक्षणाचा प्रसार करीत आहे. हा पाटीलपुरा म्हणजे कामाचे जे डोंगर आहेत त्यांतील एक ठेंगणा खडक होय. पश्चिम खानदेशांत दुर्दैवानें मीच पहिला पदवीधर व कयाधू इतकी सुशिक्षित तीच पहिली स्त्री. हें पालटलं पाहिजे; तरच अंधार संपून डोंगरमाथ्यावर सूर्य दिसूं लागेल व आमची दशा उजळेल. '

## दोन टोकांची टक्कर ! : : : १५

जयदेवाला सदोदित वाटे, ' खूप पैका मिळवावा, खूप परोपकार करावा. गोरगरिबांचा दुवा घ्यावा. पैशापेक्षां तोच आपणांस जास्त समाधान देईल. देवानें आपणांस कलाहि अशी दिली आहे कीं, जीमुळें आपल्याला सतत जनसेवा करतां येईल...'

पण हें त्याचे विचार केवळ वाऱ्यावरचें ठरत. तो मिळवील त्या पैशावरदेखील त्याच्या बायकोचा ताबा असे. घरांतील खर्च, शिलकीची व्यवस्था, रोजचा हिशेब...सर्व कांहीं तीच पाही.

xx xx xx

लहानपणीं पोरका झाल्यापासून जयदेवाचें शिक्षण त्याच्या सासऱ्यानें केलें. डॉक्टर झाल्यावर ज्यांच्या आश्रयानें तो वाढला त्यांची मुलगी बकुळा

हिच्याशीं जयदेवाचा विवाह झाला. लग्नानंतर पांच वर्षेपर्यंत त्याचा सासरा हयात होता. मरतांना सासऱ्यानें जयदेवाला बजावलें होतें,

' जयदेव, तूं आतां मोठा डॉक्टर झालास—गांवढ्या गांवांत दवाखाना थाटूनसुद्धां तुझा जम चांगला बसला आहे. माझी जिंदगी मी तुझ्याच हवाली केलेली आहे—बकुलची आई तिच्या लहानपणींच वारली. त्यावेळे-पासून मी तिला एकाद्या फुलासारखी जोपासली हें तूं बघतोसच......'

बोलतांना कष्ट होत होते, तरी तशीच जीभ रेटीत सासरा जावयाला म्हणाला—

' माझी शेवटची इच्छा अशी कीं, तूं माझ्या बकुलला सुखी राखावेंस ! तिच्या शब्दाबाहेर कधींहि जाऊं नयेस ! करशील ना असे ? दे पाहूं वचन.'

बकुळेच्या वडिलांनीं जयदेवाचें वचन घेतलें व मग प्राण सोडला.

ꕥ ꕥ ꕥ

तशी बकुळा फार प्रेमळ होती. आपला पति जयदेव आणि पुत्र नंदू ही तिची जीव कीं प्राण होती. दोघांचीहि जपणूक करतांना तिनें स्वतःच्या सुखाकडे केव्हांच पाहिलें नाहीं. जयदेवाच्या कपड्यांची तरतूद ठेवणें, रोज दुपारीं चारला त्यास नित्य नवा पदार्थ करणें या बारक्या—सारक्या गोष्टीहि तिचें नवऱ्याबद्दलचें प्रेम ठळक करून सांगत होत्या.

नंदू आतांशीं कुठें मराठी दुसरींत होता. अभ्यासांत तो चलाख असे. आणखी अवखळहि अतिशय होता तो. त्याच्याहून मोठ्या मुलांच्या नंदू खोड्या काढी. कुठें भिंतीवर चढ, कुठें झाडावर चढ हा त्याचा रोजचा उद्योग असे. प्रत्येक दिवशीं एकादी तरी कागाळी त्याच्या नांवाची यायचीच. नंदूला आवरतां आवरतां बकुळेची अगदीं पुरे वाट होऊन जाई.

पण हा तिचा स्निग्धपणा वरील दोघांच्यापलीकडे कधींच गेला नाहीं. बकुळेचें एवढेंच चिमणें जग. यापलीकडील विश्वाची कल्पना तिचें कोंझें मन करूं शकत नव्हतें. आज जयदेवानें इतके पैसे मिळविले, " आज नंदूनें अमक्याची खोडी काढली, घरांत त्यानें असा हट्ट केला, " हींच तिचीं सुखदुःखें. घराच्या उंबरठ्याबाहेर प्रत्येक मनुष्यास काय काय अडचणी येतात, कोणतीं संकटें त्याचें मार्ग रोखून धरतात, त्याबद्दल

आपलें कर्तव्य काय? या प्रश्नाविषयीं तिनें कधीं विचारहि केला नाहीं. किंबहुना तिची असल्या बाबतींत डोक्याला शीण देण्याची इच्छाहि नव्हती;

* * *

तिला एवढें माहीत होतें कीं नवरा, पुत्र व आपण हा आपला संसार. हा संसार सुखाचा पाहिजे आणि तो तसा होण्यास पैसा अवश्य हवा.

आणि जयदेव परोपकाराच्या पोटतिडकेनें कांहीं बोलला कीं बकुळा त्याला आडवे लावी. ती म्हणे,

'तुम्हाला एक वाटत असेल आपण तुकारामबुवा बनावें म्हणून. पण इकडे प्रपंचाची धूळधाण होईल त्याची वाट काय? आजकाल पैसा कोणी सोडीत नाहीं. जो तो हात राखून परोपकाराच्या बाता करतो. परोपकार, लोकसेवा असल्या वेडानें स्वतःच्या नोकऱ्या सोडून बायका मुलांना अन्न अन्न करायला लावणाऱ्यांचीं उदाहरणें कांहीं थोडी नाहीं आपण पाहात. तुम्ही म्हणतां आपला दवाखाना धर्मार्थ करावा! तुम्हांला ठाऊक आहे कां कीं सुक्याबरोबर ओलेंदेखील जळतें. चांगलें दौलतवंतसुद्धां असल्या फुकट औषधखान्याचा फायदा घेतात...! बाबांनीं एवढ्याचसाठीं कां तुम्हांला शिकवले न् दवाखाना घालून दिला! तुम्ही गडगंज पैसा मिळवा, आपण आपल्या नंदूला पुष्कळ शिकवून शहाणा करूं! अजून आपली शिल्लक असावी तितकी नाहीं—तरी मी एकदेखील दुखणाइत फुकट घेऊं नका असें बजावलें आहे म्हणून इतकें, नाहीं तर...'

जयदेव यावर म्हणे,

'बकुळे, तुझा आग्रह बरोबर आहे, पैसे मुदलीच घेऊं नयेत असें मी कुठें म्हणतों; पण परिस्थिति पाहून! या पंचक्रोशींत एवढाच दवाखाना आहे, प्रत्येकाला रोजची दहा आणे फी नि चार रुपये व्हिजिट फी कशी परवडायची! आधी पैसे घ्यायचे व मग औषध द्यायचें हा तर तुझा कायदा. कित्येक वेळेला पैसा हाताशी नसतो. डॉक्टराची गरज असते... दवाखाना फक्त एकच...'

'पुरे पुरे, एवढा एकच दवाखाना आहे म्हणून तर आपली प्रॅक्टीस जोरांत चालली आहे. शिवाय मनुष्य अडल्यावर पैसे अगोदर टाकतो अन् आपला दाम चट्कन वसूल होतो. पुढें आणखी एकादा दवाखाना आला

कीं चढाओढ सुरू होईल! तोंपर्यंतच आपली लाट आहे. पैशानें गब्बर झालें पाहिजे आपण! नंदू इंग्रजी शिकायला लागला कीं शहरांत त्याला पाठवायचा आहे...मी त्याला विलायतेला धाडणार! आय्. सी. एस्. करणार. त्याच्या शिक्षणाला पैसा थोडा कां पाहिजे? तुमच्या परोपकाराच्या खुळानें लेकराची शाळा राहील बाजूला! त्याला धर्मशाळेंत दिवस कंठायला लावण्याचे चाळे सुचताहेत तुम्हाला! मी सांगतें त्यात तसूचीहि चूक नाहीं! कोणी आले! पैसे नाहीं म्हणाले, तर चक्क उत्तर द्यावें कीं, ' मी गरीबांचा डॉक्टर नाहीं. पैसे असले तर या.' चट् पैसे देतात! असें कितीकदां झालें आहे......'

* * *

बकुळेच्यापुढें जयदेवाचें कांहींच चालत नसे. कित्येक वेळां असें दुखणाइत येत कीं, त्यांना दोन बाऱ्या खायला मेटायचीसुद्धां भ्रांत! मग त्यांच्यापाशीं पैका कोठून असणार! अशा पेंचांत अडकलेले ते रोगी कांहीं कर्जवाम करून त्यास पैसे आणून देत. अशा वेळीं जयदेवाला वाईट वाटे. तो बकुळेची परवानगीहि घेण्यास जाई मोफत औषध देण्याबद्दल! पण तिचा नकार ठरलेला असे.

रोज रात्रीं, जमलेल्या पैशांचा हिशेब करतांना बकुळा त्यास आकडा सांगे. जयदेव वरकरणी हंसे—पण आपली जनसेवेची इच्छा तृप्त होत नाहीं अशी त्याला तळमळ वाटे. तथापि लगेच त्याच्या मनांत येई, ' आहे हें सगळें बकुळेचेंच आहे. मी जेव्हां पोरका होतो तेव्हां इतका मोठा होईन, निष्णात डॉक्टर म्हणून मानमरातब पावेन असें माझ्या स्वप्नांत तरी होतें कां? बकुळेच्या वडिलांनींच ना मला उबदाऱ्याला आणलें, मलाहि आपला हेतू घटकाभर बाजूस सारून तिच्या अर्ध्या वचनांत राहिलेंच पाहिजे.'

* * *

जयदेव दवाखान्यांत एका रोग्याला तपाशीत होता. संध्याकाळीं साडेपांच सहाचा सुमार असेल! बकुळा दवाखान्यांत एका खुर्चीवर बसली होती. नंदू अजून शाळेंतून न आल्यामुळें त्याची ती वाट बघत होती. इतक्यांत एक म्हातारी बाई धावऱ्या धावऱ्या आंत आली.

बाई गरीबच होती हें तिच्या फाटक्या लुगड्यावरून स्पष्ट दिसत होतें.

जयदेवाचें तिच्याकडे लक्ष गेलें नव्हतें. त्याचें रोग्याला तपासणें अद्याप चालूच होतें.

चुळबुळत थोडीशी कळ काढून ती बाई अखेर म्हणाली—

'डॉक्टर, इथून जवळच मैलावर वाडी आहे. तिथं मुलगा......'

जयदेव तिजकडे लक्ष पुरवून म्हणाला, 'काय! मैलभर लांब वाडीला यायचें न् मुलाला पाह्यचें.'

बाई होकार देऊन म्हणाली, 'लौकर चला डॉक्टर!'

'चार रुपये व्हिजिट फी आधी घेऊन ये, मग ते येतील' बकुळा म्हणाली.

जयदेवाचा नाइलाज होता. त्याच्या मनांत जायचें होतें; पण बकुळे-समोर त्याची मात्रा चालत नव्हती.

'डॉक्टर, देव तुम्हाला सुखी ठेवील. महिन्या महिन्यांत मला पैसा नजरेला पडत नाहीं...चार रुपड्या कुठून आणूं? पोर घटकेचा सोबती आहे. सर्व शरीर रक्ताळलें आहे...चला डॉक्टर, देव तुमचें गोमटें करील...'

'बाई' बकुळा म्हणाली, 'त्यांना रगड कामें आहेत, तुझं रडगाणं ऐकायला सवड नाहीं...पैसे असले तर ये, नाहींपेक्षां गांवांत खूप वैद्य आहेत, बघ कुणी फुकट दवा देणारा...!

बाईनें एकदां केविलवाण्या दृष्टीनें डॉक्टर जयदेवाकडे पाहिलें.

तो तरी काय करणार? तो बकुळेचा गुलाम होता.

त्यानें तिचीच 'री' ओढली, 'जा बाई चार रुपये आणा मग येतो.'

ती बया आंसवें गाळीत दवाखान्याबाहेर निघून गेली.

* * *

तिन्हीसांजा झाल्या. काळोख दिसूं लागला तरी नंदू आला नाहीं, तेव्हां बकुळा अस्वस्थ झाली. शाळा मास्तर जवळच राहात असल्यामुळें तिथें तिनें शोध घेतला.

मास्तर म्हणाले, 'नंदू पांच वाजतांच वर्ग सुटला तसा इतर मुलां-बरोबर बाहेर पडला!...'

'तो घरींच आला नाहीं हो!' बकुळा धडधडत्या उरानें कशीबशी बोलली.

तिला नंदूची हुरहुर लागली. नंदूला केव्हां पाहीन असें तिला होऊन गेलें.

सगळया गांवांत तपास केला, तरी नंदूचा ठावठिकाणा कळेना. जयदेवहि काळजी करूं लागला. दोघांनीं पैसे देऊन आसपास लोक पाठविले.

रात्री नऊ वाजले. जेवण नाहीं, खाण नाहीं! दोघेहि येरझारा घालीत तपासास गेलेल्या इसमांच्या वाटेकडे डोळे लावून बसले होते.

जराशानें एकजण धांवत धांवत आला. त्याच्या हातांत नंदूचे पाटी-दप्तर होतें.

'कुठें आहे नंदू ?' जयदेव व बकुळेनें एकदम विचारलें.

तो मनुष्य धापा टाकीत म्हणाला,

'डॉक्टर, इथून मैलावर वाडी आहे. तिथें एका म्हाताऱ्या बाईच्या घरांत नंदू बेशुद्ध स्थितींत आहे. अंधारांत प्रथम उमगेना पण पुस्तकावरचें नांव चिमणीच्या उजेडांत वाचलें तशी खात्रीच झाली. त्याच्या सर्वांगाला काटे टोचले आहेत...'

* * *

जयदेव आपली कातड्याची पिशवी घेऊन बैलगाडींतून त्या वाडीकडे वेगानें गेला. बकुळा त्याच्याबरोबर होती.

वेळ निघून गेली होती. नंदूचा प्राण कुडीपार झाला होता. बकुळेचें हृदय दोन भाग झालें. ती काळजाचा थरकाप उडविणारी किंकाळी फोडून नंदूच्या अंगावर पडली. जयदेवानें निराशेनें इकडे तिकडे पाहिलें.

अश्रु ढाळणारी बाई! त्या चंद्रमौळी झोपडीची मालकीण—

'मघाशीच आपल्या दवाखान्यांत आलेली ही म्हातारी !...त्याच वेळीं बकुळेनें आपल्याला परवानगी दिली असती तर......!' जयदेवाचें भकास मन भरधांव सुटलें.

ती बाई रडत रडत म्हणाली, 'डॉक्टर मघाशीच कां नाहीं आलांत ? गरीबीचा उपमर्द केलात; लेकरू देवाघरी धाडलेत.'

हे उद्गार ऐकतांना जयदेवाच्या अंतःकरणाला विलक्षण यातना झाल्या.

हळूं हळूं त्याला सारी हकीगत समजली. नंदू शाळेंतून पाटीदप्तर घेऊन जांभळें काढण्यासाठीं संवगडयाबरोबर इकडे आला. पुष्कळ उंच चढून तो मित्रांकडे जांभळें फेंकीत होता—तो उभा असलेली ठिसूळ फांदी मोडली; तशी त्याच्या बरोबरचीं मुलें भिऊन पळालीं. नंदू घाबरून ओरडत निवडुंगांत पडला. नंदूच्या किंचाळण्याचें शब्द ऐकतांच म्हातारीनें धावाधाव केली. नंदूला झोंपडींत आणलें व त्याला दवापाणी करण्यासाठीं ती डॉक्टर जयदेवाला बोलावणें गेली. अन् बकुळेच्या श्रीमंती धमकावणीनें बिचारी भेदरून अधिक उणें न बोलतां परत फिरली...जयदेवाच्या डोळयांत पाणी घरंगळूं लागलें—

बकुळेनें तर शोकाची परमावधी केली. एकुलता एक सोन्याचा तुकडा नेल्याबद्दल देवाला दोष दिला.

पण दोष कुणाचा ? जयदेव म्हणे, ‘ अपराध आपलाच ! आपण गरीबीला पायदळी का तुडवलें ? दारिद्र्याचा अपमान कां केला ? माणुसकीपेक्षां पैसा श्रेष्ठ कां मानला ? सहजच गरीबी न् श्रीमंती या दोन टोंकांच्या टकरींत आपल्या सुखाचा चक्काचूर झाला...नेहमींच गरिबांनीं हाय खावी असें थोडेंच आहे...’

बकुळेला व जयदेवाला नंदूची आठवण बुझणें शक्य नव्हतें. जयदेवाचे परोपकार करण्याचे विचार बकुळेस आतां पटूं लागले, पण ती नेहमीं अंतःकरण पिळवटून उद्गार काढी—

‘ परमेश्वरा, त्यांच्या उदात्त कल्पना माझ्या गळीं उतरावायला एवढेंच का रे साधन होतें ? ही साधी बाब मला पटवायला माझ्या लाडक्याचे मोल का रे घेतलेस ? ’

# लोककथा

## आई ?-- छे !--पूतना ! : : : १

राज्यांत नेहमीं दुष्काळ पडे, तेव्हां प्रजेला ममतापुरःसर वागवणाऱ्या राजानें तळें खोदण्याचा पट्टा पत्करला.

तळें खणलें, सगळें झालें, पण त्यास पाणी येईना. काळीगार लागेतों कुदळ चालविली, तरी ही अवस्था !

राजानें त्याच्या पदरीं असलेल्या प्रख्यात ज्योतिषाची मसलत घेण्याचें ठरवलें.

ज्योतिषि उपाय सांगण्यांत चुकारपणा करूं लागला. शेवटीं राजाकडून अभय मागितल्यानंतर तो म्हणाला,

' तुझा सर्वांत धाकटा राजपुत्र उद्यां उजाडतांच तळ्यांत उभा कर. असें केलेंस तर सपाटून पाणी येईल ! '

ही बातमी धाकट्या राजेसरकारांच्या हुजऱ्यानें ऐकली. त्यानें आपल्या धन्याला ती गुपचुप कळवली.

धाकट्या युवराजानें ताबडतोब आपल्या पत्नीचा सल्ला–मामला घेतला. त्याच दिवशीं रात्रीं उभयतांनीं निघायचें ठरलें.

राजपुत्राची बायको पन्ना ही गरोदर होती. पन्नेनें आधीं येण्याचें नाकारलें. केवळ नवऱ्याच्या आग्रहावरून ती नवऱ्याच्या पुढें घोड्यावर बसली.

दाट आरण्यांत घोडे आले. पन्नेच्या घशाला शोष लागला. कावळ्यांचे थवे आसपास होते; तेव्हां जवळ कोठें विहीर असावी असा राजपुत्रानें अजमास केला. विहीर आढळली. धाकटा राजपुत्र पाणी आणायला विहिरीवर गेला.

भांड्याला सोल लावून त्यानें तें विहिरींत सोडलें. इतक्यांत विहिरीमध्यें एक राक्षस निर्माण झाला. त्यानें धाकट्या राजपुत्राला गिळलें.

अणि असें होतांच तिकडे राजानें तयार केलेल्या तळ्याला पाण्याचें सोट फुटले. राजाने आपल्या मुलाचा व सुनेचा कोणीतरी ग्रास केला असावा असा कयास केला.

पन्ना बराच वेळ घोड्यावर थांबली. नंतर ती विहिरीकडे गेली. तेथें तिनें नवऱ्याचे जोडे पाहिले.

एकंदर प्रकार तिनें जाणला. सोल सोडून तिनें पाणी काढलें.

तोंच मघाचा राक्षस निर्माण झाला. हा बायकांना खात नसे. पन्नेला थोडीफार या राक्षसाची मोहिनी वाटते न वाटते; एत्रढ्यांत तें अजस्र धूड अदृश्य झालें.

याच समयीं देवलोकाहून घराकडे निघालेल्या सात अप्सरा विहिरीवर पाणी पिण्याकरितां आल्या.

त्यांनीं पन्नेची स्थिति पाहून तिला घरीं नेलें.

अप्सरांना मुलांची कमालीची हौस होती. पन्नेला मुलगा झाला, तसा त्यांना अतिशय आनंद भरला.

मुलगा मोठा होत होता. त्याच्या कमरेंत कांहीं तरी अलंकार अडकवावा असें अप्सरांना वाटलें.

एकदां इन्द्रासमोर त्यांचा अप्रतिम नाच झाला. तो बेफाम आवडून इन्द्र म्हणाला,

‘ अहो नृत्यांगनानो, तुम्हाला जें हवें तें मागा ! ’

अप्सरांनीं इन्द्राच्या कमरेची सोन्याच्या घुंगुरांची सांखळी मागितली.

‘ कशाला ? ’ इन्द्रानें विचारलें.

‘ आमच्या घरीं एक बाई राहायला आली आहे, तिचा गोंडस मुलगा आहे. ’

‘ असं होय ! मग घ्या तर सांखळी ! ज्याच्या कमरेला ही बसवाल तो अमर होईल. ’

अप्सरा इन्द्राला प्रणाम करून निघाल्या.

पन्नेच्या मुलाच्या कमरेभोंवतीं घुंगुरांची सोन्याची सांखळी गुंडाळली गेली.

कुमार रत्नसिंह दिवसेंदिवस जाणता होत होता.

सात अप्सरांच्या सात खोल्यांच्या किल्ल्या रत्नसिंहापाशीं अप्सरा ठेवून जात.

—अंगाची एक हलकी जखम धुण्याकरितां असाच कधीं तरी रत्नसिंह विहिरीवर पाणी काढीत होता. तेव्हां तेथें उत्पन्न झालेल्या राक्षसाची व त्याची तलवारातलवारी झाली. रत्नसिंहानें दैत्याला जाया केलें, वाहून घरीं आणलें, आणि एका खोलीमध्यें कडीकुलुपांत ठेवलें.

अप्सरांना त्यानें सारा वृत्तांत सांगितला. आई भिईल म्हणून तिजपाशीं तो एक शब्दही बोलला नाहीं.

आईनें त्याजजवळ खोल्यांच्या किल्ल्या मागितल्या तेव्हां सहाच खोल्यांच्या किल्ल्यांचा जुडगा रत्नसिंहानें दिला.

सातव्या खोलीच्या किल्लीबद्दल पन्ना हट्टाला पेटली, तेव्हां मात्र रत्नसिंहानें ओढून धरलें नाहीं.

किल्ली मिळतांच पन्नेनें कोंडलेला जखमी राक्षस पाहिला. त्याला तिनें सांजा खाऊ घातला. अप्सरा देवलोकांत नाचायला जात. रत्नसिंह अरण्यांत जाई, तेवढ्या अवधींत पन्नेची नि राक्षसाची मैत्री वाढत चालली.

आकस्मिकपणें एक दिवस घरीं आलेल्या अप्सरांनीं हा प्रकार पाहिला. त्या रागावल्या. त्यांनीं राक्षसाला हाकललें व पन्नेसाठीं लांब ठिकाणीं घर बांधलें.

रत्नसिंहाला जाऊं देणें अप्सरांच्या जिवावर आलें. पण पन्नेनें घुश्शात मुलाला अप्सरांशीं संबंध सोडण्यास फर्माविलें. अप्सरांचा आतां नाइलाज झाला.

पन्नेच्या नव्या ठिकाणीं राक्षस रोज येई. रत्नसिंह शिकारीला गेला कीं दोघेजण सोंगट्या खेळत बसत.

हलके हलके त्यांचें प्रेम जमत चाललें. तरणाताठा रत्नसिंह ही दोघांनाही भली मोठीच धोंड वाटायला लागली !

ह्या अडथळ्याचा फडशा करण्याच्या वाटाघाटी सुरू झाल्या.

शिकारीहून रत्नसिंह माघारी येत होता. त्याच्या घुंगुरांचा आवाज दुरूनच आला. सोंगट्या खेळणारा राक्षस लपला. पन्ना डोळे बांधून पलंगावर लवंडली.

'काय ग झालं आई ?' रत्नसिंहानें कळवळून विचारलें.

'माझे डोळे दुखतात रे बाळ !'

'मग कशानं बरे होतील ?'

'तुझा बाप होता ना ? तो मला डोळे दुखले कीं वाघिणीचं दूध आणी तेव्हां कुठं दुखण्याला उतार पडे.'

'हात्तिच्या ! मी आणतों वाघिणीचं दूध !'

रत्नसिंह गेला. फिरून राक्षस व पन्ना सोंगट्याच्या पटावर बसलीं.

रानांत हिंडत असतां रत्नसिंहानें करवंदीच्या झुडपामध्यें कुणी वाघीण वेदनेनें डरकाळत होतीं, तिला पाहिलें. वाघिणीच्या पायांत कांटा मोडला होता.

'मी तुला काय देऊं शकणार ?' वाघीण कृतज्ञतेनें विचारूं लागली !

'तुझं दूध हवं आहे मला.'

'ठीक आहे ! अन् त्याच्या जोडीला माझं एक पिल्लूं ने माझी आठवण म्हणून !'

लांबचा घुंगरांचा आवाज येतांच राक्षसाला दडवून पन्ना कण्हत पडली. मुलगा न मरतां परत आला याचा तिला विषाद वाटला !'

रत्नसिंहानें ओल्या शेल्याचें दूध पिळलें तें तिनें मुकाटयानें फेंकून दिलें.

'आराम वाटतो ?' रत्नसिंहानें विचारलें.

'छे रे, माझ्या राजबिंडया ! असं डोळयाचें तंत्र फार बिघडलं म्हणजे तुझा बाप हंसिणीचं दूध आणीत असे !'

'बघतों मी ! प्रयत्नांत कसूर करीत नाहीं.'

वाघाचें पिल्लू खांद्यावर टाकून रत्नसिंह निघाला.

हंसीण वस्तीला होती, तिथलीं पिल्लें रोज एक साप खायचा.

रत्नसिंह पोंचला त्या वेळीं हंसीण बाहेर गेली होती. पिल्लें स्वैर वावरत होतीं. साप त्यांना डंखूं पाहत होता.

रत्नसिंहानें तलवार उपसली. सापाचीं त्यानें खांडोळी केलीं व त्यावर आपल्या ढालीचें आच्छादन घातलें. दमल्यानें रत्नसिंहाला गाढ झोंप आली.

हंसिणीच्या सगळयांत जाणत्या पिलानें आईला सारी हकीकत सांगितली.

रत्नसिंह उठल्यावर हंसिणीनें म्हटलें,

'तुम्ही कृपायुक्त झालांत म्हणून माझीं पोरं बचावलीं, याचा मोबदला मीं काय देणार ?'

'द्रोणभर दूध पाहिजे आहे मला.'

'एक सोडून दोन द्रोण न्या. माझं दूध शिंपल्यानं मेलेलीं माणसं जिवन्त होतात. माझ्या थोरल्या बच्चावर बसून जा तुम्ही !'

रत्नसिंहानें वाघाचा बिचवा व दुधाचे दोन द्रोण घेतले. हंसिणीच्या मोठ्यांतल्या मोठया पिलावर तो आरूढ झाला.

वाटेंत एक राजकन्या नुकतीच न्हाऊन गच्चीवर केस सुकवीत होती. तिनें आकाशांत भरारणाऱ्या रत्नसिंहाला पाहातांच त्याला येण्यासाठीं खुणावलें.

रत्नसिंह गच्चीवर टेकला—त्यानें जाण्याची घाई चालवली. आपल्या आईचें डोळे दुखत असल्याचें त्यानें सांगितलें.

' निव्वळ ढोंग दिसतं आहे!' सारें कांहीं ऐकून राजकन्या म्हणाली. ' अप्सरांनीं तुमच्या आईला ज्या राक्षसाकरतां हाकून लावलं, त्याच्याच छंदाला ती गुंतली असावी.'

आईविरुद्ध असें गैरवावगें बोललेलें रत्नसिंहाला खपलें नाहीं. म्हणूनच त्यानें राजकन्येची लग्नाची विनंती रागारागांत झिडकारली.

' निदान या दोन द्रोणांतला एक तरी ठेवा. तुमची आठवण असूंद्या मजजवळ...'

रत्नसिंहानें एक द्रोण राजकन्येला दिला नि वाघाच्या बच्चासकट हंसावर स्वार होऊन तो निघाला.

घुंगरांचा अस्पष्ट ध्वनि येतांच पन्नेनें राक्षसाला लपविलें.

तिनें हंसिणीचें दूध चिपचाप ओतून दिलें आणि लेकाला ती म्हणाली. ' अजूनही नाहीं उतार पडत; डोळे नुसते खुपताहेत! प्रकृति इतकी चढली, कीं तुझा बाप सातां समुद्रांपलिकडचा सात चिंचेचा पाला घेऊन यायचा.'

रत्नसिंह हंसावर बसून वाघाच्या पिलानिशीं साता समुद्रापार गेला. त्यानें पाला तोडला.

खालीं अक्राळ विक्राळ असे सात राक्षस होते. त्यांनीं रत्नसिंहाला पकडलें. कोणी त्याला खावें, याची त्यांच्यांत झुंज माजली.

रत्नसिंह म्हणाला, ' मी झाडावर चढतों, तिथून उडी मारतो. ज्याच्या तोंडांत पडेन, त्यानें मला सबंध खावें. अशानें एकाचें तरी पुरतें पोट भरेल.'

राक्षसांनीं ह्याला मान्यता दिली.

पण रत्नसिंह चिंचेच्या झाडावरच्या हंसावर असलेल्या वाघाच्या पिल्लाला घेऊन उंच उडाला.

मार्गात तो पुन्हा राजकन्येच्या दृष्टीस पडला. रत्नसिंहानें राजकन्येच्या खालीं उतरण्याच्या सूचनेकडे दुर्लक्ष केलें.

अशा रीतीनें राक्षसानें योजलेलें एकूण एक इलाज थकले. पन्नेनें आतां डोळे पूर्ववत् झाल्याचें मुलाला सुनावलें.

पुढें पन्नेच्या आग्रहानें रत्नसिंहाच्या शिकारीच्या कार्यक्रमांत खळ पडला. उभयतां मायलेक सोंगटयांचीं प्यादीं इकडचीं तिकडे सरकवूं लागलीं.

'रत्नसिंह, मी हरलें तर तूं माझी गर्दन तोडायची अन् तुझा पराभव झाला तर मी तुझी मान कापीन.'

ही अट रत्नसिंहाला कशीशीच वाटली. तथापि आईला कितीहि डोकें-फोड करून सांगितलें तरी ती ऐकेना.

पहिल्या डावांत पन्नेला रत्नसिंहानें जिंकले. परंतु तो बोलला 'कांहीं का असेना, तूं माझी आई आहेस. मातृहत्त्येला माझा हात धजावणार नाहीं !'

नंतर पन्नेच्या प्याद्यांची सरशी झाली.

तिनें मुलाची गर्दन छाटली, धड नि मुंडकें एकमेकांपासून विभक्त ठेवून एक पेटी भरली; त्यावर हंस व वाघ बसवले आणि ती पेटी नदी-मध्यें सोडण्यांत आली !

तरंगत जाणारी पेटी जलविहाराकरितां आलेल्या राजकन्येनें पाहिली. वाघ व हंस पाहिल्यावर तिला पेटींत कोण असणार याचा संशय उरला नाहीं.

तिनें राजवाडयांत पेटी नेली. रत्नसिंहाचें धड व मुंडके सरसानें चिक-टविलें, तशी रत्नसिंह हालचाल करूं लागला. द्रोणांतील हंसीचें दूध शिंप-डतांच तो उठून बसला.

रत्नसिंहाला मागील कांहीं स्मरेना. त्याच्या स्मृतीची राजकन्येनें चाळ-वाचाळव केल्यावर एकंदर इतिहास त्याच्यापुढें उभा राहिला.

'तुमचीं कमरेच्या सांखळीचीं घुंगुरं इथं ठेवा न् तुम्ही जा. तुमची आई काय करते तें चाहूल लागूं न देतां न्याहाळा.' हा राजकन्येचा उप-देश प्रमाण मानून रत्नसिंहानें घुंगुरें काढलीं.

वाघाचें पिल्लूं घेऊन तो हंसाच्या पंखावर बसला.

घरीं रत्नसिंहाला राक्षस व पन्ना एकत्र आढळलीं.

राक्षसाचा त्यानें तिथल्या तिथें निकाल लावला. पन्नाचें नाककान कापून तिला रत्नसिंहानें जंगली पशूंत सोडलें.

रत्नसिंह राजकन्येकडे परत गेल्यावर दोघांचें लग्न झालें. रत्नसिंहाला सासऱ्याचें अर्धें राज्य मिळालें. एक दिवस चैनीनें तो अरण्यांत पारध करीत असतां विहिरीकडे गेला. त्याला शेजारींच घोड्याचें खिंकाळणें ऐकूं आलें.

पन्ना व तिचा नवरा—धाकटा राजपुत्र यांनीं ज्याच्यावर बसून राजधानीपासून विहिरीपर्यंत दौड मारली, तोंच हा म्हातारा इमानी घोडा धन्याची वाट पाहत तेथें वावरत होता. त्यानें रत्नसिंहाला त्याचा बाप येथपर्यंत कसा आला हें कथन केलें आणि विहिरींतील राक्षसानें कदाचित् त्याचा फन्ना केला असावा ही आपली शंका प्रगट केली.

मग रत्नसिंह मोठ्या लव्याजम्यासह आपल्या आजोबांच्या राजधानीबाहेर डेरे ठोकून राहिला.

राजाला प्रश्न पडला. शत्रू चालून आला असें त्याला भासलें. सैन्यासह शस्त्रास्त्रें परजीत राजा सामोरा आला.

आजोबांची चेहरेपट्टी इमानदार घोड्यापाशीं विचारून ठेवल्यानें राजाला ओळखणें रत्नसिंहाला जड गेलें नाहीं. आजोबांच्या पायांवर त्यानें लोटांगण घातलें. नातवानें आजोबाला इत्थंभूत वृत्तांत सांगितला. आपल्या बापाचा नि दुष्ट आईचा इतिहास त्यानें वर्णन केला.

म्हातारा गहिंवरला. त्यानें नातवाला कांहीं आठवडे ठेवून घेतले आणि राज्यांतील हिस्सा देऊन मोठ्या बहुमानानें रत्नसिंहाची त्यानें रवानगी केली.

## झुमकी : : : २

एक होता राजा. त्याला सात राण्या होत्या. त्यांतल्या सहा आवडत्या होत्या व एक नावडती होती. नावडती राणी राजधानी बाहेरील रानांतल्या खोपटांत राहात असे.

या राजाला मूलबाळ नव्हते. त्यानें पुष्कळ नेमधर्म केले. राजघराण्याची कडक देवता होती तिची उपासना केली. पण अं हं. त्याच्या व्यथेचा परिहार झाला नाहीं. राजा निपुत्रिकच राहिला.

होता होता समुद्रापलीकडच्या कोणा देवाची किरत राजाच्या कानीं गेली. त्या देवाची भली थोरली जत्रा भरण्याच्या संधीला राजा दूरदेशास जायला निघाला. त्यानें प्रधानाला बरोबर घेतलें. समुद्रावरच्या सहलीला आरंभ होण्या अगोदर राजानें त्याच्या आवडत्या राण्यांना काय काय

जिन्नस हवेंत तें विचारले. कुणी आरसा मागितला, कुणी कंगवा, कुणी टिकली, असे वेगवेगळे पदार्थ राण्यांनीं यजमानाला आणण्यास सांगितलें.

जहाज बंदर सोडण्याच्या सुमाराला राजास सातव्या राणीची सय झाली. तिचाहि हेतु पुरवावा असें राजाच्या लहरीनें घेतलें. त्यानें होडगे झाकारायचे मुद्दाम थांबवलें व प्रधानाला सातव्या नावडत्या राणीकडे धाडले.

नावडत्या राणीनें पुतळी मागितली.

परत येताना राजानें सहा राण्यांच्या वस्तु बिनचूक आणल्या. पुतळी हा दागिना त्यानें ज्या दुकानांत शोध केला तिथें मिळाला नाहीं. मग त्यानें फारशी चौकशी न करतां एक बोलणारी कुत्री त्या जत्रेच्या बाजारांत होती तीच नावडत्या बायकोकरतां खरेदी केली.

नावडत्या राणीला वाईट वाटलें. बिचारी कुत्रीच्या संगतीत दिवस कंठून राहिली होती. त्या बोलक्या कुत्रीचें नांव झुमकी असें होतें. तिच्या सहवासांत राणीचा काळ बरा जात होता.

एकदा नावडत्या राणीला ताकाची गरज भासली. ते आणायसाठीं तिनें झुमकीला आपल्या सवतीच्याकडे धाडले.

जेव्हां झुमकी ताकाकरता गेली तेव्हां सहाहि राण्या न्हाणीघरांत अंग धूत होत्या. त्यांनीं आपलें अलंकार ताकाच्या भांड्याच्या झाकणावर काढून ठेवले होतें. झुमकीला ताक न्यायला सांगताना ही गोष्ट एकादेखील राणीच्या ध्यानांत आली नाहीं.

दागिन्यासकट ताकाचें भांडे घेऊन झुमकी आपल्या धनिणीकडे गेली.

झुमकीनें जडजवाहीर चुलीखालीं पुरले आणि मालकिणीला ताकाचें भांडे पावते केले.

खूप वेळानें सहा राण्यांचीं अंगधुणीं आटोपलीं. त्यांनीं दागिने हातोहात चोरीला गेले ही वर्दी राजापर्यंत पोंचवली.

राजाला झेंडू फुटला. काय करावे हे त्याला सुचेना. प्रधान, शिपाईप्यादे जमले. ताक नेणाऱ्या झुमकीची मुलाखत घेण्यांत आली. नावडत्या राणीच्या झोंपड्याची झडती झाली. तपास लागला नाहीं.

इतक्या दिवस नावडती राणी आपल्या सवतीच्या रुबाबापुढें माळवल्यासारखी झाली होतीं. झुमकीनें तिला आतां द्रव्य दिलें; तिला प्यार

असा पुतळी हा अलंकार चुलीखालच्या खड्ड्यांतून झुमकीनें उकरला; सारा वृत्तांत सांगत एकंदर सोनेनाणे झुमकीनें मालकिणीच्या हवाली केलें.

खोपट्याच्या जागी ऐसपैस महाल बांधण्यांत आला.

राजा एक दिवस शिकारीला गेला असतां अरण्यांतला डौलदार इमला बघून दंग होऊन नेला. हा महाल आपल्या बायकोचा, हे समजल्यावर त्याला ते ठिकाण हक्काचें वाटलें. राणीनें व झुमकी कुत्रीनें राजाला, जेवण-खाण, चुनापान, अत्तरगुलाब देऊन त्याची चांगली बडदास्त राखली.

आताशा बऱ्याच वेळा राजेसरकारांची स्वारी त्याच रानांत शिकारीस जाऊं लागली, किरण साधून श्वापदांना बाण मारण्याचे सोडून नावडत्या राणीच्या महालांत घटका घटका रमू लागली.

अशा प्रकारें राजाचा नावडत्या राणीकडे राबता सुरू झाला.

नंतर झुमकीनें एक दिवस हुजूर स्वारीस सांगितलें,

' महाराज, राणीसरकारांना दिवस गेले आहेत. '

राजाचा ऊर आनंदानें दाटला. आपल्या वंशाचे पांग फेडणाऱ्या राणी-वर आपण उगाच इतराजी केली असे राजा झुमकी कुत्रीपाशीं म्हणाला,

—पण मुळांतच ओंफस् होते. झुमकीनें एकुणएक पदरचे राजाला सांगितलें होते.

बोलून गेलेलें शब्द वठवायचे कसें हाच पेंच झुमकी कुत्रीला पडला.

मूल होईपोतर राणीची राजाला भेटण्याची इच्छा नाहीं असें कळवून झुमकी कुत्रीनें आपलें संकट तूर्तास तूर्त दिवसगतीवर ढकलले.

लटकी बाब खरी ठरविण्यासाठीं झुमकीनें दोन सुईणी बाळगल्या. त्यांना भरपूर पैसे देऊन राजधानींत ' राजाला मुलगा झाला ' ही द्वाही त्या फिरवतील असा घाट घडवला गेला.

नावडत्या राणीला हे सोंग अप्रशस्त वाटत होते. पण ' राजाचें प्रेम तुला मिळवून देईन ' हे झुमकी कुत्रीचें आश्वासन तिला मुकाट बसायला भाग पाडीत होते.

झाले. राज्यांत मेवामिठाई वाटली गेली. राजाच्या मर्जीतल्या सहा राण्यांची सुरत उतरून गेली.

राजा कुत्रीला बोलावून म्हणाला,

'झुमकी, आमच्या कुळस्वामिनी देवीच्या दर्शनाला मूल नेण्याचा आमचा रिवाज आहे.'

झुमकीला विचार पडला. अखेर शेवटीं ती बोलली,

'बरें, मी घेऊन जाईन......तुम्ही माझ्यापासून दूर अंतरावर असा......'

'हरकत नाहीं' राजा उद्गारला.

देवळाच्या दिशेनें राजा, प्रधान,मंत्री इत्यादि लव्याजम्यानिशी निघाला, तेव्हां झुमकी बरीच आघाडीला होती.

तिनें उडदाच्या डाळीच्या पिठाची बाहुली तयार करून ती तेलांत तळली होती. हीच भावली एका हाऱ्यांत घालून आणखी तो पाठीवर घेऊन, झुमकी चालली होती.

देवळांत शिरल्याबरोबर झुमकीनें तडक गाभारा गांठला, राजा प्रधान वगैरेजण मंडपांत उभे राहिले.

झुमकीनें देवीसमोर उडदाच्या पीठाची बाहुली धरतांच ती देवीनें गट्ट केली. तशी घाबऱ्या घाबऱ्या शेपटी व कान जोराजोरानें हलवीत झुमकी केकाटली.

काय झाले हे पाहण्याकरता राजा गाभाऱ्याकडे सरसावला.

—तोंच देवी ओकली. तिच्या पोटांतली बाहुली उचमळून बाहेर आली. ही बाहुली सजीव होती. ते एक पोर होते. ते टाहो फोडून रडत होते.

नावडत्या राणीला आणवण्यांत आले. मूल दिसतांच तिला पान्हा फुटला.

हा देखावा पाहून राजाचे देहभान हरपले. त्यानें देवीला नमस्कारांची लाखोली वाहिली.

झुमकीची धनीण पट्टराणी झाली. राजाची ती सर्वांत प्रीतीतली राणी बनली.

उभयतां राजाराणी मुलाचे संगोपन करीत सुखानें राज्य करूं लागले.

झुमकी कुत्रीशिवाय राजवाड्यांतला कुठलाच कारभार होत नव्हता.

पट्टराणीच्या साहीहि सवती रानांतल्या महालांत राहून झुमकी कुत्रीच्या तंत्रानें कालक्रमणा करीत होत्या.

## गोसाव्याच्या गोष्टी : : : ३

परमुलुखांतील खेडेगांवचा बाजार संपवून एक कुणबाऊ घोडेस्वार आपल्या देशाला चालला होता.

सडकेनें त्याला कुणी गोसावी भेटला. गोसाव्याच्या चर्येच्या ठिकाणीं अलौकिक तेज जडलेले दिसत होते. त्या कुणबी घोडेस्वाराला तर असें वाटलें कीं हा अवलिया आकाश फाडून आला असावा.

घोडे आस्तेकदम नेत गप्पावेल्हाळ कुणब्यानें इकडच्या तिकडच्या हकीगती गोसाव्याला भक्तिभावानें सांगितल्या. बोलण्यावरून बोलणीं निघतां त्यानें म्हटले,

‘ गोसावीदादा, तोंडाला फेंस फुटेपर्यंत मी वटवट केली ! आतां आपण कांहीं गरम बातम्या, नाहींतर कथा–गाथा सांगा कीं ! ! ’

‘ मी फुकट बडबडपुरी करणार नाहीं ... ... एकएका वाक्यांत गोष्टी आटपेन ... ’ गोसावी साधूला शोभेशा शांत नि सौम्य वृत्तींचा एकंकार करून उद्गारला.

‘ चालेल.’

‘ माझ्या गोष्टींना पैका पडेल. ’

‘ मागाल ते आपल्या पायाशीं हजर करीन. माझ्या शेतावरल्या मालाचा विक्रा होऊन शंमर रुपये आले आहेत ... मी सडा माणूस ... सगळेच्या सगळे पैसे उधळले तरी कोण माझें डोकें मारणार...हं आटपा...’

गोसावी म्हणाला,

‘ रस्त्यानें जातांना पान तंबाखू खायची असली तर वाट सोडून कासराभर आंत बसावें ! झाली गोष्ट ! हिचा दाम पांच रुपये !! ’

‘ दुसरी सांगा ’

‘ कुणाच्याहि उपयोगी पडावें. झाली गोष्ट ! टाक पांच रुपये.’

‘ गोसावी महाराज, तुमचा गुरुमाउलीचा उपदेश ऐकावा असा माझ्या मनानें कौल दिला आहे ... आणखी गोष्ट ... ’

‘ रात्रीं एकाद्याकडे निजायला गेले तर जागून रात्र काढावी ... ’

‘ अजून एक ... ’

‘ कुणाचेंहि काम इमानदारीनें करावें...हं...चार गोष्टींचे वीस रुपये झाले लागू...’

कुणब्यानें गोसाव्याला नमस्कार करून रक्कम त्याच्या हवालीं केली.

सडकेला वळण फुटल्यानें दोघेहि वेगवेगळ्या दिशेला गेले.

—दुसऱ्या दिवशीं दुपारीं जवळचा बटवा काढून कुणबी पानतंबाखू खायला कासराभर मार्गाच्या आंत बसला.

मधेंच त्यानें चरायकरतां मोकळे सोडलेले घोडे, पिसाळलेले कुत्रे डसल्यानें रानोमाळ भडकले.

कुणबी घोडे शोधण्यास बराच लांब गेला. ते सांपडल्यावर कुणब्याच्या एकदम ध्यानांत आले. घोड्याचे जीन व पानतंबाखूचा बटवा ह्या वस्तू तो विडा खायला बसला तिथेंच राहिल्या होत्या.

लगबगीनें कुणबी घोडयावर स्वार होऊन माघारीं आला.

जिनसा गवसल्या तसा कुणबी हर्षातिरेकानें स्वतःशींच म्हणाला,

'खाशी झाली! केवळ रस्त्याच्या बाजूला कासराभर बैठक आंत होती म्हणून ऐंशी रुपये बचले...पांच रुपये देऊन ऐकलेली गोष्ट निर्फळ ठरली नाहीं...'

पुढें रात्रीचा मुक्काम त्यानें नजीकच्याच गांवीं केला.

ज्या घरीं तो उतरला तिथें रडारड चालू होती. चौकशी करतां कुणब्याला समजलें कीं घरमालकाच्या एकुलत्या एक मुलावर मोठाच पेच ओढवला आहे. आणि त्यामुळें सारे घर दुःखाखालीं चेपले आहे.

त्या राज्यांतली जी राजकन्या होती तिचें लग्न व्हायचे होते. यासाठीं राजकन्येबरोबर जो एक रात्र घालवील आणखी दुसऱ्या दिवशीं जिवंत हाती लागेल, त्याला राजाची मुलगी व निम्मे राज्य बिनतक्रार द्यायचे अशी विचित्र अट घालण्यांत आली होती.

प्रथम प्रथम हा पण पुरा करण्याची खुद्द राज्यांतील आणि परराज्यांतील सरदार दरकदार कुटुंबामधल्या व राजकुलांतल्या माणसांनीं अगदीं बळकटी धरली. परंतु कुणीच जिवंत राहीना. इतकेंच काय पण कुणाचें धडहि नजरेला पडत नसे.

प्रतिज्ञा भोगण्यास कुणी धजत नाहीं हे पाहिल्यावर राजानें पुकारा केला,

'प्रत्येक घरघरटी एकेका तरुणावर राजकन्येच्या लग्नाची अट पाळण्याबाबत सक्ति होईल.'

—आणि कुणबी ज्यांचा पाहुणा होता त्या बिऱ्हाडावर अशी पाळी आलेली होती.

कुणबी 'कुणाच्याहि उपयोगी पडावें' ही गोसाव्याची गोष्ट विसरला नव्हता. तो जाण्यास सज्ज झाला.

आपला बटवा त्यानें बरोबर घेतला होता.

राजकन्येच्या महालांत रात्रीं तो गेला.

'कुणाहिकडे निजायला गेले असतां रात्र जागून काढावी' असा गोसाव्याचा मंत्र त्याच्या हृदयांत घुमत होता म्हणून राजकन्या झोंपी गेली तरी कुणबी जागाच राहिला.

मध्यरात्रीच्या संधीला राजकन्येच्या नाकांतून एक किडा बाहेर आला. त्याचा लगेच साप बनला.

कुणबी शेजेवरचा उठला. पानतंबाखूच्या बटव्यांतला धारदार अडकित्ता त्यानें काढला व सापाचें तोंड काटलें.

ह्याच सर्पाचें हळूं हळूं अक्राळविक्राळ राक्षसांत रूपान्तर होई. राजकन्येशेजारच्या जवानाला हा राक्षस खावून टाकीत असे. नंतर पुन्हा साप व मग किडा होऊन राजकन्येच्या नाकांत, तो आला तसा, परत जायचा.

—पण त्या अगोदरच, सापाच्या अवस्थेंत असतांना राक्षसाचा निकाल लागला.

राजकन्येशीं कुणब्याचें बड्या इतमामानें भरथाटांत लग्न झाले व एकांडा शिलेदार असा हा कुणबी राजाच्या नि राजकन्येच्या अर्ध्या गादीचा हक्कदार बनला.

तरी पण कुणब्याच्या मनाचा ओघ पूर्वस्थितीकडे धावे. त्याला मळ्यांत जावेसें वाटे. पाबर...कुळव...नांगर धरणें...मोटवण...असला शेतांतला कोणचा तरी उद्योग करावा ही इच्छा कुणब्याला अनावर होई.

अखेरी एक दिवस त्यानें मागला कुणबटाचा पोषाख चढवला व तो बायकोला म्हणाला,

'माझी लहर आहे...अशा अवतारांत मी गांवाबाहेर शेतावर खपायला जातो...तूं न्याहारी घेऊन ये...'

'केव्हांशीक ?' राजकन्येनें विचारलें.

'आत्ता कुठं उजाडतंय्...तीनचार तास दिवस चढल्यावर तूं न्याहारी घेऊन वाजत गाजत नीघ...मी तुला रस्त्याच्या कडेच्याच वावरांत दिसेन त्या जागेच्या सुमारानें यायचें हं...'

खूण सांगून जांवईबुवा निघून गेले.

रस्त्यालगतचे कित्येक मळे जोंधळ्याच्या कणसांनीं फुलले होते. सकाळच्या गारव्याची चमक हवेच्या अणूरेणूंत साठली होती. धुक्याच्या वाफा वातावरणांत उठत होत्या. नाना रंगांनीं खुललेल्या क्षितिजाच्या कडा सूर्याला बोलावीत होत्या. अशा वेळीं एका वावरांत कणसे तोडण्याचें काम नुकतेच सुरू झाले होते.

देखरेख करणाऱ्या मालकाला कुणबी जाऊन भेटला.

पैशाला चिकट असलेल्या शेताच्या मालकानें कष्टाच्या कोष्टकाच्या मानानें रोजगारीचा भाव इतर गडीमाणसाहून कमतीच ठरवला.

'कुठेंहि इमानदारीनें चार पाट्या टाकाव्या' अशा अर्थाचा गोसाव्याचा कानमंत्र कुणब्याच्या मनांत प्रदक्षिणा घालीत होता. इतर चाकरांच्या-सारखा आळसांत काळ न गमावता, त्यांच्याप्रमाणें टंगळमंगळ न करता, तो इमानेइतबारे कणसे कडाकड मोडीत होता. कुणब्यानें तोडलेल्या कणसांचा ढिगारा बाकीच्या गड्यांच्या दृष्टीला बोंचत होता.

न्याहारीच्या वेळेला सगळ्यापेक्षां याचेच काम जास्त भरले.

बायागड्यांनीं आपापली न्याहारी सोडली. कुणब्यानें न्याहारी आणली नव्हती. हा उपटसुंभ गडीमाणूस कमी हिशेबाच्या बोलीनेंदेखील आपल्या-हून जास्त कामाचा फडशा पाडणार, आपल्यापेक्षां रोज मिळवण्यांत वरकडी करणार, या आकसानें कुणब्याशीं कुणीहि नीट बोलेना. त्याची थट्टाच होऊं लागली.

मालकानें कुणब्याला विचारलें,

'तुझी न्याहारी कुठें आहे?'

'ती इतक्यांत वाजत गाजत येईल' कुणब्यानें जबाब दिला.

सारे मजूर खोखो हंसले.

मालकहि चेष्टेच्या आवाजांत म्हणाला,

'तुझी न्याहारी वाजत येईल!! येवढा तूं कोण लागून गेलास!!'

'तुम्हांला लबाड वाटतंय्?'

'हो हो' चिक्कू मालक त्याला पुरते बोलूं न देतां म्हणाला. 'पैज लावतोस! तुझी न्याहारी वाजत मिरवत नाहीं आली तर आजचा रोजगार बिनपैशांत करशील?'

'करीन! पण तशी आली तर!'

'तुला इथून तिथून आख्खे शेत लिहून देईन' शेताचा धनी म्हणाला.

अन् न्याहारी जराशानें खरेच डामडौलानें आली. कुणबी राजाचा जांवई आहे हे सगळ्यांना समजलें.

मालकाचा पहिला आवेश विरघळला. त्याचें मन ठसठसूं लागले.

कांहीं ठरलेंच नव्हते हे म्हणायला त्यानें आरंभ केला. शेत देण्यास तो नाकबूल झाला.

पण गडी माणसें सरकार दरबाराविरुद्ध कशी जाणार? जांवयाच्या बाजूनें त्यांनीं साक्ष भरली.

अशा रीतीनें मनाला चाहेल तेव्हां शेतकाम करण्यास जावयानें स्वतःच्या हिंमतीनें एक भला जंगी मळा मिळवला.

ज्या गोसाव्याच्या चारहि उपदेशपर गोष्टींचा मागोवा घेतल्यानें कुणब्याला बरकतीचें दिवस दिसले, त्याची कुणब्यानें पळापळाला आठवण काढली, त्याचा खूप शर्थीनें तपास केला.

—पण गोष्टी सांगणारा गोसावी खरोखरीच दैवी पुरुष होता कीं काय कोण जाणे! तो फिरून कुणब्याला केव्हांच दिसला नाहीं.

## तुरेराव ! ४

राजधानींतल्या गांवीं जी शाळा होती तीमध्यें राजपुत्र व प्रधानाची मुलगीं ही जात असत.

दोघेहि एकाच वर्गात होतीं. प्रधानकन्या अभ्यासांत हुशार होती. म्हणून तर राजपुत्राहून वयानें लहान असताना देखील त्याच्या बरोबरीनें तिचा अभ्यास चालूं होता. ती शिक्षकांची आवडती शिष्या होती.

राजपुत्र, त्याच्याच वर्गातल्या कालकूट नांवाच्या एका उनाड मुलाच्या संगतीत सांपडला होता.

दोघेजण अभ्यासाचे तास चुकवण्यात वाकबगार होते.

वर्गात कालकूटाची उत्तरे बहुतेककरून चुकत. त्यावेळीं वास्तविक सारा वर्ग हंसे. परंतु मास्तर प्रधानकन्येची स्तुती गात तेव्हां तिच्यावरच तेवढा कालकूटनें डूख धरला.

एकदां राजपुत्र व कालकूट विस्या–गोट्या खेळण्यांत रमले असतां त्यांना शाळेला यायला उशीर झाला.

मास्तर रागावले आणि चांगली अद्दल घडवण्यासाठीं त्यांनीं प्रधान कन्येला कालकूटाच्या नि राजपुत्राच्या एक एक थोबाडीत मारण्यास सांगितले.

प्रधान कन्येनें जसजसे आढेवेढे घेतले तसतसे गुरुजी अटीला पेटत चालले.

सरते शेवटीं शिक्षकांच्या आज्ञेखातर प्रधानकन्येनें कालकूटच्या न् राजपुत्राच्या गालफडांत लगावल्याचा देखावा केला.

यांत प्रधानकन्येचा खरे पाहतां कांहींच अपराध नव्हता. पण कालकूटानें राजपुत्राला प्रधानकन्येची तिळा एवढीहि नसलेली चूक आभाळा इतकी असल्याचें भासविलें आणि त्यास चिथावीत म्हटलें,

'काय बाळासाहेब, अरे आमचे एक राहू द्या, पण तुमच्या सारख्या भावी राजाच्या, प्रधानकन्येने...यःकश्चित् नोकराच्या मुलीनें–मुस्काडीत मारावी—हं: हं:...'

कालकूटाच्या या डसून बोलण्याचा परिणाम होऊन राजपुत्र संतापानें म्हणाला,

'बस् बस्, खरा असेन तर या प्रधानकन्येशीं लग्न करीन नि झालेल्या अपमानाचा सूड उगवीन...'

राजपुत्राचा हा निश्चय प्रधानकन्येच्या कानावर गेला तशी ती मनांत फार भ्याली.

* * *

हलके हलके राजपुत्र वयांत आला; त्याला वेगवेगळ्या राजेरजवाड्यांच्या मुली सांगून येऊं लागल्या.

राजपुत्र कोणतीहि मुलगी पसंत करीना. त्याच्या मनांतून प्रधानाची मुलगी करावयाची होती; परंतु ती सांगून येईना. बरोबरच आहे! प्रधान राजाचा नोकर! त्यानें राजपुत्रासारख्याची जांवई म्हणून इच्छा करणें हास्यास्पद ठरलें असतें.

एकंदर बनाव कसा घडवून आणावा, हें राजपुत्राच्या ध्यानांत उतरेना.

एकाएकी त्याला कालकूटाची आठवण झाली. त्याने आपल्या जुन्या मित्राला बोलावणें धाडलें.

ह्या वयापर्यंत कालकूटाला कुठेहि नोकरीधंदा लागला नव्हता. राजपुत्राचें हें काम त्याच्या आवडीचेंच होतें. तें करतां करतां स्वतःची मीठभाकरीहि कायमची मिळवायची, असें त्यानें ठरविलें.

राजपुत्राला कालकूट म्हणाला, 'तूं घोड्याच्या पागेंत निजून रहा ! कुणी कांहींहि उपाय केले तरी डोळ्याची पापणी हलवूं नकोस...'

—अशी सुरवात करून त्यानें एकंदर बेत राजपुत्राला ऐकवला.

राजानें मुलगा उठावा यासाठी अनेक वैद्य आणले, मंत्र तंत्र केले. साऱ्या खटपटी व्यर्थ गेल्या.

इतक्यांत कालकूट राजाकडे येऊन म्हणाला, 'महाराज, मी युवराज बाळासाहेबांना सावध करतों. '

कालकूटनें राजपुत्रावरून लिंबू उतरून टाकलें. आणि त्याच्या अंगावरून तीनदा हात फिरवला; तों काय ! राजपुत्र शुद्धीवर आला.

राजाची कालकूटाच्या ठिकाणीं श्रद्धा बसली. त्याला बडी हुद्याची जागा दिली गेली आणि राजा त्याचें ऐकूं लागला.

एक दिवस कालकूट राजाला म्हणाला, 'महाराज, तुम्ही बाळासाहेबांचें प्रधानकन्येशीं लग्न लावा. योग फार चांगले आहेत. मुलगी त्यांना पसंत पडेल याबद्दल मुळीच काळजी नको. '

राजानें ताबडतोब प्रधानाला आपली मनीषा बोलून दाखविली.

प्रधान खूपच आनंदला. तो लगबगीनें ही शुभवार्ता आपल्या मुलीस कळवायला नेला.

प्रधानकन्येला लहानपणची राजपुत्राची प्रतिज्ञा आठवली. ती भयभीत झाली. पण वरकरणीं तिनें आपण आनंदी आहों असें दर्शविलें.

यथासांग लग्न पार पडलें.

राजपुत्रानें प्रधानकन्येला तलवारीच्या धारेवर धरलें. तिला शिक्षा करण्यासाठी तो टपला. पण त्याला तसें करण्यास सबबच मिळेना. प्रधानकन्या चतुर होती. ती आपल्या कर्तव्यांत रतिभरहि कसूर होऊं देत नसे.

* * *

हताश होऊन राजपुत्र आपल्या मित्राला म्हणाला, ' कालकूट, ही अगदीं बिनचूक वाटते—मारायला सवडच सांपडत नाहीं.'

' बाळासाहेब, ' कालकूट म्हणाला ' तुम्ही असं करा. तिला विचारा कीं, मी गांवाला जाऊं का ? हो म्हणाली तर, मी जावें अशी इच्छा करतेस असा अर्थ करून मारा ... नाहीं म्हणाली, तर इच्छेच्या आड येते म्हणून मारा ! '

' बरं आहे ' राजपुत्र उत्तरला.

नंतर त्यानें आपल्या बायकोला विचारलें, ' मी गांवाला जाऊं कां ? '

' जशी आपल्या मर्जीची गोष्ट ' प्रधानकन्या म्हणाली.

या अनपेक्षित उत्तरानें राजपुत्राचा हिरमोड झाला. तो फिरून कालकूटाकडे गेला.

कालकूट म्हणाला ' बाळासाहेब जाऊंच या आपण ! मी कांहीं महिन्यांची रजा घेतों. तुम्ही कांहीं काळ दूर राहिलांत म्हणजे तुमच्या बायकोंत नक्की पालट पडेल.'

राजपुत्राला राजाराणी परवानगी देईनात. तेव्हां कालकूट म्हणाला, ' महाराज, राणीसरकार न् तुम्ही बाळासाहेबांना जाऊं द्या. दूर देशचीं राज्यें बघितलीं कीं त्यांच्या अनुभवांचें भांडार वाढेल...'

हो ना करतां करतां राजाराणीची अनुमति मिळाली.

राजपुत्राला जायच्या अगोदर प्रधानानें जेवायला बोलावलें. निघतांना राजपुत्र प्रधानकन्येला म्हणाला—' मी परत येईतों एक मोठा थोरला वाडा, त्याभोंवतीं हरतऱ्हेच्या फुलांची बाग, अन् वाड्याच्या प्रत्येक दाराला पाचू—मोतीं—माणकांचीं तोरणें लावलेलीं, एवढें तयार पाहिजे...'

प्रधानकन्या स्वस्थ राहिली. जरा वेळानें हातांतला गुंफलेला जाईचा तुरा नवऱ्याच्या शिरोभूषणांत खोवून ती म्हणाली ' हा तुरा नेहमीं ताजा राहील. तो जेव्हां वाळेल, तेव्हां माझें पातिव्रत्य भ्रष्ट झालें असें खचित समजा...'

देशान्तराला निघालेल्या राजपुत्राबरोबर कालकूट निघाला होता. त्यानें कांहीं काळ रजा काढली होती. कालकूटाला आहे या नोकरीहूनहि मानाची जागा दुसऱ्या राज्यांत मिळाली तर पाहिजे होती.

दुसऱ्या एका राज्याच्या राजदरबारांत दोघेजण गेले. हांजी-हांजी-खोरपणा कालकूटाच्या अंगीं पुरेपूर मुरलेला होता. तो सहजच राजाचा खुषमस्कऱ्या झाला.

आणि राजपुत्राला दरबारांतच एक हलकीशी चाकरी देतांना राजानें विचारलें—

'तुझें नांव काय ?'

'तुरेराव' राजपुत्र उद्गारला.

एकदा राजाच्या मनांत कांक्षा उत्पन्न झाली कीं, आपण रोज रंगी-बेरंगी फुलांचे तुरे घालतों; अन् तुरेरावाच्या डोक्यांतला सदोदित जाईचाच पांढरा तुरा त्याला आवडतो कसा ?

राजानें भरदरबारांत तुरेरावाला तसा प्रश्न विचारला.

तुरेराव म्हणाला 'हुजूर, हा एकच तुरा—माझ्या बायकोने खोवला आहे.'

प्रधानकन्येची शर्त तुरेरावाने राजाला सांगितली.

'काय ! हा तुरा कधीं सुकणार नाहीं ! या दरबारात कोणी असा आहे का, की जो तुरेरावाच्या डोक्यावरला तुरा वाळवील ! मी त्याला माझ्या राज्यांतला एक प्रान्त इनाम देईन...'

खुषमस्कऱ्या कालकूट तत्काळ उभा राहून म्हणाला, 'मी या तुरे-रावाचा तुरा वाळवून दाखवतों हुजूर.'

प्रधानकन्येला मारण्यास नामी संधि सापडणार असें सांगून कालकूटाने राजपुत्राचा आपल्या कार्यास पाठिंबा मिळविला !

कालकूट पहिल्या राज्यांत परत आला. राजवाड्यांत राजपुत्राची वाट पाहत दिवस कंठणाऱ्या प्रधानकन्येची त्याने भेट घेतली.

पुष्कळ दिवस लाळघोटेपणा केल्यावर कालकूटाने स्वत:ची हलकट इच्छा बोलून दाखविली आणि म्हटलें, 'तूं नवऱ्याला पाहण्यास उतावीळ झाली आहेस, हें मी जाणतों. माझ्या म्हणण्याप्रमाणें वागलीस, तर राज-पुत्र बाळासाहेबांकडे तुला मी नेईन...'

धूर्त प्रधानकन्येने विचार करून उत्तर दिलें 'ठीक आहे. पण अगोदर

हिरे-माणिकें-पाचूंचीं तोरणें दारागणिक आहेत, सुंदर बाग भोंवती आहे, असा वाडा मला पाहिजे आहे तो बनवून द्यावा.'

कालकूटाने तसा वाडा आठ दिवसात तयार करून दिला.

मग प्रधानकन्या म्हणाली ' आज रात्रीं आपली इच्छा पूर्ण होईल. मी मेण्यांत बसून अंधारातनं येईन; एक शब्दहि बोलणार नाहीं आणि पहाटेच्या आंत परत फिरेन. '

कालकूटाने संमति दिली.

रात्रीं प्रधानकन्येने आपली बटीक स्वतःचा पोषाक घालून पाठवली.

कलकूटाला वाटलें आपली इच्छा पुरी झाली व तो मोठ्या खुषींत राजाला भेटून म्हणाला, ' द्या मला प्रांत इनाम ! मी तुरेरावाच्या बायकोचें पातिव्रत्य भ्रष्ट केलें...'

पण तुरेरावाचा तुरा कोठें सुकला होता !

* * *

राजानें खुषमस्कऱ्या कालकूटाला खोटें बोलल्याबद्दल राज्याबाहेर हाकून लावलें. तेव्हां नाक मुठींत घेऊन बिचारा कालकूट आपल्या पहिल्या राज्यांतल्या नोकरीवर रुजू झाला.

इकडे प्रधानकन्या पुरुषाचा वेष घेऊन तुरेराव चाकरी करीत असलेल्या राजाच्या दरबारीं गेली. तिने राजाजवळ नोकरी मिळविली.

तुरेरावाशीं तिनें स्नेह जमवला.

एक दिवस तुरेरावाला ती म्हणाली, ' तुरेराव, तुझें लग्न होऊनदेखील तूं ब्रह्मचाऱ्यासारखा राहतोस...येथें एक सुस्वरूप बाई तुला मिळेल...'

तुरेरावाने आढेवेढे घेतांच प्रधानकन्या म्हणाली, ' तुझ्या बायकोची कशाला पर्वा करतोस ? खुषमस्कऱ्याने तिचें पातिव्रत्य भ्रष्ट केलें...तिच्या म्हणण्याप्रमाणें तुरा वाळला नाहीं हा तिचा दोष...पतिव्रता थोडीच आहे तुझी बायको, तिचें शब्द खरे व्हायला ! ! '

तुरेरावाला हा युक्तिवाद पटला.

त्या रात्रीं एका सुंदर स्त्रीने तुरेरावाचें स्वागत केलें. तिचा चेहरा तुरेरावाला मनसोक्त निरखावयाला सापडूं नये अशीच सर्व योजना होती.

तरी पण त्या स्त्रीच्या असामान्य लावण्याची मोहिनी तुरेरावावर पडली हें खास.

यामुळेच तुरेराव निरोप घेत असतां, त्या बाईनें त्याची अंगठी उभयतांच्या गोड भेटीची आठवण म्हणून मागितली. तेव्हां तुरेरावाने ती लगेच तिच्या बोटांत बसविली.

दोन महिने त्या राज्यांत राहून प्रधानकन्या आपल्या राजधानींत परत गेली. आणखी सात महिने लोटले. प्रधानकन्येला मुलगा झाला.

तिने राजाला नवऱ्याचा पत्ता सांगून त्याला बोलावण्यासाठी विनविलें.

राजा–राणींची आज्ञा घेऊन कालकूटच राजपुत्राला आणण्या- र्सी गेला.

आपल्याला मुलगा झाल्याची बातमी ऐकतांच राजपुत्र संतापला. कालकूटाचेंच म्हणणें खरे असल्याचा त्याला संशय आला आणि आपला तुरा वाळला नाही याचें राजपुत्राला नवल वाटलें.

कालकूटानें राजपुत्राला डिवचीत म्हटलें, 'बाळासाहेब, आतां बायको तुमच्या तावडींत चांगली सापडली आहे. तिला बेदम मारा, शाळेंत तुम्हांला आपमानिल्याचा सूड घ्या...'

प्रधानकन्या राजपुत्रानें मागणी केलेल्या,सगळया दारांना पाचू–माणिक–हिऱ्यांचीं तोरणें, निरनिराळया फुलझाडांचा एक भव्य बगीचा असलेल्या वाडयांतच बाळंत झाली होती.

राजपुत्र आल्याचें समजतांच चाणाक्ष राजकन्येनें, त्याची अंगठी नि त्याचा मुलगा दोनहि त्याच्या पायाशीं ठेविलीं.

स्वतःची अंगठी बघतांच राजपुत्र विलक्षण वरमला. त्यानें प्रधानकन्येची क्षमा मागून पश्चात्तापानें म्हटलें, 'थांब, तुझ्यादेखत त्या कालकूटाला फटक्यांची शिक्षा देतों. त्यानेंच तुझा परोपरीनीं छळ करण्यास मला सांगितलें...'

पण पुढें केवळ प्रधानकन्येच्या विनंतीनेंच कालकूटाला फटके बसण्याचें टळलें. त्याची हुद्दयाची जागा मात्र गेली.

राजाला नातू झाल्यामुळें सर्वत्र आनंदाचें साम्राज्य पसरलें.

## गगनाला गवसणी ( कथासंग्रह )

ले.—विष्णु गणेश भिडे

# कांहीं अभिप्राय

केसरी ( पुणें ):—'...कथानकाची योजना चातुर्यानें करण्यांत व त्याची रचना आकर्षक पद्धतीनें करण्यांत लेखकानें चांगलें यश कमावलें आहे...'

विविधवृत्त ( मुंबई ):—'...भिडे हे अक्षुण्ण मार्गांनीं जाणारे कथालेखक आहेत...शेतकरी व खेडवळ लोक यांच्या जीवनांतील रम्य प्रसंग आपल्या कथांमधून वाचकांसमोर मांडण्याची त्यांची वृत्ति कौतुकास्पद आहे...खेड्यांतील अशिक्षित लोक, त्यांचे आचारविचार, त्यांची राहणी, चालीरीति व आशाआकांक्षा यांचीं मोहक शब्दचित्रें भिडे यांच्या लेखणीनें या संग्रहांत रेखाटलेली असल्यानें वाचकांना खमंग रुचिपालट झाल्या-सारखें वाटेल खास...'

महाराष्ट्र ( नागपूर ):—'...खेडेगांवांतील लोकांच्या जीवनाचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांची शब्दचित्रें रेखाटण्यांत लेखकाचें कौशल्य प्रगट झालें आहे...बेकारी दारूबंदी यासारख्या प्रचलित प्रश्नांचा सुद्धां त्यांनीं आपल्या गोष्टींतून चांगला उहापोह केला आहे...'

प्रा. श्रीपाद महादेव माटे:—'...भिडे यांच्या लिहिण्यांत कांहीं विशेष प्रकारचा रेखीवपणा व बांधेसूदपणा आहे...समाजांतील निरनिराळ्या खंडांतील, चालीरीतींची, समजुतींची आर्थिकसंबंधांची जी गल्लत सध्यां चालू आहे तिची कल्पना मधून मधून येत असल्यामुळें लेखकाच्या अव-लोकन शक्तीविषयीं फार अनुकूल अभिप्राय होतो...'

चिं. ग. कर्वे:—'...अप्सरा' या गोष्टींत पावरा जातीच्या भिल्लांची जी माहिती आढळते ती पुष्कळांस नवीन वाटेल. समाजशास्त्राभ्यासास तिचा उपयोग आहे...'

किं. १॥ रु. ]

प्रकाशकः—य. गो. जोशी, ६२३।१५ सदाशिव पेठ, पुणें.